भक्ती आणि शुद्ध आध्यात्मिक बैठक यांचा खोल ठसा बोरकरांच्या मनावर उमटलेला आहे. आमच्याशी काकासाहेबांच्याबद्दल ते वारंवार बोलले नाहीत; फारच थोड्या वेळा, पण मोजकेच ते जे काही बोलले त्यावरून एक ध्यानी आले की, जे 'आनंदयात्रित्व बोरकरांना गुरुदेव टागोरांच्या कवितेत लाभले, ते कालेलकरांच्या सान्निध्याने अधिक प्रकाशमान झाले असावे. जीवनातील आनंदाचे अखंडपणे आणि सूक्ष्मत्वाने भान कसे राखावे, तो आनंद कलावंताच्या तटस्थतेने कसा अनुभवावा, याची अधिक स्पष्ट जाण त्यांना आली असावी. तसेच काकासाहेबांच्यामुळे बोरकरांच्या ठिकाणी मुळातच असलेली गांधीभक्ती अधिक डोळस आणि खोल झाली असावी.

'महात्मायना'चा प्रारंभीचा काही भाग पुण्यास असतानाच बोरकरांनी लिहिला होता. तो एका बैठकीच्या वेळी त्यांनी म्हणून दाखविला. ज्ञानेश्वरीची शब्दकळा, प्रतिभारूप आणि अंतरंग घेऊन येणारी ही नवी ओवी ऐकून खरोखर आम्ही स्तिमित झालो होतो. 'महात्मायन केव्हा पुरे होईल याची उत्कंठा लागून राहिली होती. पण काही केल्या बोरकरांच्या हातून पुढील एक ओवीही लिहून होईना. यासांबंधी बोलत असता, ते एकदा म्हणाले की —

"महात्मा गांधी उमगायला महात्म्याचीच प्रज्ञा आणि महात्म्याचेच हृदय हवे आहे; आज वीस वर्षे झाली बोरकर 'महात्मायना'च्या सुवर्णताटी अमृत ओगरण्यासाठी साधना करीत आहेत. महात्माजींच्या आचार–विचारांत भारतीय जीवनदर्शनाचे आदर्शरूप बोरकरांना दिसे. त्यांच्या तत्त्वप्रणालीमध्ये भगवान बुद्धाची सत्य व अहिंसा आणि तारक येशूची सेवा व करुणा, यांचा चैतन्यपूर्ण संगम झाल्याचे आढळे. बोरकर ख्रिस्त आणि बुद्ध यांचे पुनःपुनः भक्त्यादरपूर्वक स्मरण करताना आढळतात. त्याचबरोबर त्यांच्या कवितेत भक्तीची मूर्ती म्हणून आत्मसमर्पण करणाऱ्या मीराबाईचा उल्लेख येतो. सायंप्रार्थना या गीतांतील बोरकरांची गांधीभक्ती ही याच जातींतली आहे! तांबे–अरविंद–ज्ञानेश्वर टागोर यांच्यामुळे बोरकरांची मूळची आध्यात्मिक बैठक दृढपणे भारतीय अध्यात्मवाद्याची झाली–कालेलकरांच्यामुळे त्याला एक सुंदर सुसंस्कृत कलामीमांसा लाभली आणि बुद्ध, ख्रिस्त आणि गांधीजी यांच्या योगाने, सेवा–करुणा, प्रीती, सत्य–अहिंसा यांची त्याला जोड लाभली.

ख्रिश्चन, लॅटिन संस्कृतीच्या सान्निध्यांत लहानाचे मोठे झालेले बोरकर; केवळ इंग्रजी नव्हे, तर पोर्तुगीज, फ्रेंच, ब्राझिलियन कविता समरसून वाचणारे बोरकर; बंगाली साहित्याचा अभ्यास करणारे, हे टागोर, गांधी, अरविंद, ज्ञानेश्वर, यांच्या साहित्याने मनाच्या किती भिंती ओलांडून पार गेले असतील, ते आता सहज ध्यानी येते. बोरकरांची कविता 'तेथे कर माझे जुळती' असे कुठे म्हणते! किंवा जीवन त्यांना कळले हो!' म्हणून कोणाकडे अंगुलिनिर्देश करते! किंवा कृतार्थ जीवन म्हणून कशाचे वर्णन करते! हे पाहिले, म्हणजे बोरकरांच्या व्यापक आणि विशाल मनोभावनेची सुस्पष्ट कल्पना येते. बोरकरांच्या भारतीय तत्त्वज्ञानामध्ये बुद्ध, ख्रिस्त, ज्ञानेश्वर आणि महात्मा गांधी यांच्या तत्त्वज्ञानांचा समावेश होतो.

आचार्य विनोबाजी भावे यांच्या स्वच्छ आणि सुबोध साहित्याने त्यांच्या सत्प्रवृत्तींचा सर्वोदय झाला होता. बोरकरांच्या ठिकाणी सांस्कृतिक उदारता आली होती आणि त्यांची काव्यप्रतिभा ही विशाल मानवतेच्या जाणिवेच्या पूजनामध्ये रमून गेली होती.

म्हपशाला शिक्षक असताना, वयाच्या अठराव्या वर्षी, त्यांनी गुंडोपंत आमोणकर यांच्याकडे रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांचे ग्रंथ समरसून वाचून काढले होते. 'गीतारहस्य', 'इमिटेशन ऑफ ख्राइस्ट', 'प्लेन लिव्हिंग ॲण्ड हाय थिंकिंग' यासारख्या ग्रंथांचेही त्यांनी वाचन केले होते. अशा त्या वैचारिक ध्येयात्मक मनोऽवस्थेत त्यांनी कवीचा आदर्श स्वतःपुढे, त्यावेळी जो उभा केला होता, तो त्यांच्या 'कवि कोण?' या कवितेत पहावयास मिळतो.

देवलसी जीव सदाचा उदासी
फुकाचा सुखासी पार नसे
भावनेचा फूल भक्तीचा गोसावी
दिसे तसे गोवी काव्याभासे
लोण्याहून मऊ मायेचे अंतर
दुर्बला अंतर देत नसे
देवाचे संदेश उकलुनी दावी








विधासी सुखवी आत्मज्ञानी
मनाने बालक बुद्धीने जो वृद्ध
तोडितो संबंध जगे जरी
सौंदर्याचा भोगी जीवनी विरागी
निद्रेतही जागी जगासाठी
कर्तव्याची चाड कुडीच्या परीस
दगडा परीस करू शके
मतीने कृतीने उक्तीने निर्मळ
तेजाने उजळ करी जना
हाच खरा कवि प्रीत पाझरवी
तेजे दिपे रवि, ईश्वर हा ! (१९२८)

पंधरा–वीस वर्षांपूर्वी कविवर्य बोरकरांच्या घरात आणि मनांत जे पाहिले, ऐकीले ते मी लिहिले; आणि आजही मी तेच लिहीन. मध्यंतरीच्या काळात बोरकर बदलले नाहीत, उलट हीच त्यांची जीवनदृष्टी आणि काव्यदृष्टी अधिकाधिक विशुद्ध, विशाल आणि संपन्न होत गेलेली दिसते, आपली ही भूमिका ते आता अधिकारवाणीने आणि प्रचंड आत्मविश्वासाने मांडताना दिसत आहे. 'मुंबई व उपनगर साहित्य–संमेलना'च्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनी एका पंधरवड्यापूर्वीच, म्हणजे १४ नोव्हेंबर, १९७० रोजी, सांगितले की, "काव्यसाधना ही एक विलक्षण आनंदसाधना आहे. तिच्यासाठी कवीला शेवटपर्यंत माणूस राहून देवांशी कायमचे सख्य जोडावे लागते. त्यांच्यातला माणूस सदैव इतका उत्कट आणि जागृत असायला हवा की, त्याच्या रक्ताला माणसाची सारी प्रमादशीलता, सारी दुबळीक, सारे मोह, सारे लोभ आणि सर्व प्रकारचे हर्षविषाद सहज जाणवतील आणि त्याबरोबर त्यातून सुटण्यासाठी त्यांची जी मुकी तगमग चालते, तीही तितक्याच उत्कटपणे भावेल.

असला हा मनुष्य भाव हे त्याचे फार मोठे धन असते. त्यांचमुळे माणसांची सारी गाऱ्हाणी तो देवापर्यंत पोचवू शकतो आणि त्यांच्या कृपेचे वरदान त्यांच्या पदरात टाकू शकतो."

असा हा कवी कोणत्याही एका भाषेचा–प्रांताचा, किंवा राष्ट्राचा असत नाही. खरे तर कोणत्याही अस्सल कलावंताला भाषा, धर्म, देश इत्यादी मर्यादा नसतात. तशात बोरकरांसारखा, भारतीय अध्यात्मिक दृष्टींतून अनुभव घेणारा आणि देणारा कलावंत, कोणत्याही एका विशिष्ट भाषेत गात असला तरी त्याचे ते गायन अखिल मानवासाठी असते, आणि देवासाठीही असते. मानवांतील दानवांसाठीही तो गातो, ते त्यांच्यातील देवत्व जागे करण्यासाठी ! बोरकरांच्या कवितेचे आवाहन यामुळेच विधात्मक स्वरूपाचे आहे. यामुळे बोरकर हे गोमंतकीय कवी, महाराष्ट्रीय कवी, की भारतीय कवी, असे प्रश्न विचारणेच मूलतः अप्रस्तुत होय ! त्यांच्या सबंध काव्यांतून भारतीय तत्त्वज्ञानाचा अंतःप्रवाह अखंडपणे वहात आहे, एवढ्याच मर्यादित अर्थाने त्यांना भारतीय म्हणायचे असेल तर म्हणावे ! पण बोरकरांसारखे कवी विश्वमानवाच्या हृदयालाच हात घालीत असतात.

समकालीन सामाजिक जाणिवांचे बोरकरांना भान नाही, किंवा नव्हते, हे विधान कोणीही करू शकणार नाही व आजवर तसे ते कोणी केलेलेही नाही. समाजकारण, धर्मकारण, राजकारण यांतील प्रक्षोभक घटनांनी त्यांच्या प्रतिभेला स्वस्थ बसू दिलेले नाही. त्यांनी गोवा-मुक्ति–संग्रामात आपली कविता मनोभावे त्या मंगल कारणासाठी त्यावेळी सिद्ध केली. भारताच्या विराट आत्म्याचे स्तोत्र त्यांनी गायिले. भारताच्या स्वातंत्र्याच्या दीपोत्सवाच्या आनंदक्षणी भारताच्या दुभंगलेपणाच्या वेदनांचे आर्त उद्‌गार त्यांच्या कवितेतून प्रकट झाले. बोरकरांची 'कवी आम्हा हवा महान' ही कविता वाचली की त्यांची भारत–भक्ती किती उत्कट आणि भव्य आहे, याची कल्पना येते; आणि त्याचबरोबर अशा विराट राष्ट्राचा महोदय घडविण्यासाठी कविप्रतिभा किती उत्तुंग आणि विशाल असावयास हवी, याचीही जाणीव होते. समकालीन सामाजिक व राजकीय जाणीवा प्रत्यक्ष काव्यविषय म्हणून पत्करणे बोरकरांच्या कविप्रकृतीत बसतच नाही. बोरकर मुंबई संमेलनांतील आपल्या अध्यक्षीय भाषणांत म्हणतात की,

'तलावाचे शेवाळ बाजूला सारले, आतल्या गाळाचा उपसा केला, पाणी स्वच्छ झाले आणि क्षणकाळ का होईना, ते स्थिर झाले की, त्यात जसे आकाशाचे स्पष्ट प्रतिबिंब पहायला सापडते, तलावाला ते शोधावे लागत नाही, त्याप्रमाणे कवीच्या निर्लेप, शांत, स्थिर आणि प्रसन्न मानसात जीवनाचे सत्य, अलौकिक सौंदर्य घेऊन




स्वभावतःच प्रकट होते. अशा अवस्थेत तेथे परतत्त्वाची झलक आणि त्रिकालदर्शित्वाची चमक उमटून गेली, तर आश्चर्य वाटायला नको. असे जेव्हा वारंवार घडत राहते, तेव्हा त्याच्या या अच्छोद मानसावर उठणारा प्रत्येक तरंग हा चिरंजीव साहित्याचा एक अनन्यसुंदर आविष्कार बनतो. इथेच त्याची परतत्त्वाशी 'जवळीक जमते.' बोरकरांची ही कलाभूमिका त्यांना तांबे-टागोर-ज्ञानेश्वरांच्या वाटेने घेऊन जाणारी आहे.

'विश्वात्मक भाव' हा काही भारतीय मनाला नवा नाही. संत वाङ्मयाचा तो वारसा आहे. 'वडिलार्जित वारसा' म्हणून बोरकरांनी तो अभिमानाने जपला आहे. बोरकरांच्या ठिकाणची आस्तिक्यबुद्धी आणि आध्यात्मिक प्रवृत्ती आज जुनाटपणाची म्हणून उपेक्षणीय, अशी समजूत असणारे आज पुष्कळच आहेत. पण बोरकर हे संत-परंपरेने जाणारे अंध वारकरी नाहीत; ते कलावंत आहेत. जीवन ही एक आनंदयात्रा आहे, यावर श्रद्धा असणारे ते कवी आहेत. प्रत्येक भावानुभूती उत्कटतेने त्यांच्या कवितेत अभिव्यक्त झाली आहे. प्रीती आणि भक्ती हे त्यांचे स्थायिभाव आहेत. त्यांचे काव्यादर्श उत्तुंग आहेत आणि त्यासाठी कराव्या लागणाऱ्या खडतर साधनेची त्यांना पुरेपूर जाणीव आहे. नवे म्हणून, आपल्या प्रकृति-धर्माशी विसंगत असे, त्यांनी काही स्वीकारलेले नाही. जे भावले, ते जुने आहे, म्हणून त्यांनी टाकून दिले नाही; उलट ते आत्मानुभूतीतून, उत्स्फूर्तपणे, नव्या आकारात, अधिक तेजःपुंज रूपांत त्यांनी प्रकट केले. वस्तूंची वरवरची रूपे त्यांना मोह घालू शकत नाहीत; वस्तूंचे प्राण त्यांना दिनरात पिसे लावतात. भारतीय आत्मदर्शनांतून आणि कलावंताच्या सौंदर्यदृष्टीतून त्यांची सर्जनशील प्रतिभा कार्यरत होते. 'महात्मायन' लिहून ते संतकाव्य परंपरेला नवा अर्थ, नवे रूप देत आहेत.

बोरकरांच्या घरांत वेगवेगळ्या वस्तूंच्या रूपाने, त्यांच्या विविध प्रांतांतल्या चित्रांच्या आणि जामातांच्या रूपाने 'भारतदर्शन' घडते; त्यांच्या मनात 'भारतीय तत्त्व-ज्ञाना'चे अनंतविध विलास सदैव चालू असलेले जाणवतात. हे सारे खरे; पण याहूनही हे अधिक खरे आहे की, त्यांच्या कवि-प्रतिभेच्या कोषांत 'मनुष्यमात्राचे सर्वकाळचे, आजचे आणि उद्यांचे अनुभव केवळ चित्तलयीने आपलेसे करून घेऊ पाहणारी आणि त्यांतील अतींद्रियत्व रसिकांना इंद्रियांकरवी भोगवू इच्छिणारी काव्यसाधना' सदैव प्रस्फुरित होऊ पहात असते. विकसित मनाच्या प्रतिभेचे नवनवे उन्मेष सारखे रूप घेण्यासाठी उत्कंठित झालेले असतात. बोरकर हे प्रथम कवी आहेत, नंतर कवी आहेत, आणि अखेर व अखेरपर्यंत ते कवीच राहणार आहेत. तांबे-टागोर-ज्ञानेश्वर यांना वाट पुसत जाणारे ते सरस्वती-पुत्र आहेत. त्यांनी आपली हृदय-वीणा अष्टौप्रहर सुरांत लावून ठेवलेली आहे; तीवर कोणती अपूर्व चीज केव्हा वाजून जाईल याचा नेम नाही!

गोव्याच्या आपल्या मायभूमीत, आपल्या गावी, आपल्या घरी, 'शांतिनिकेतनां'त राहून, चित्तप्रसाद आणि प्रेमवृत्ती यांचा लाभ घडून, या कविवर्यांच्या हातून काव्य-देवता 'महात्मायन' सुफल, संपूर्ण करून घेवो, हीच या शुभक्षणी ईशचरणी प्रार्थना!

**टीप :** मांडवी : कवि बा. भ. बोरकर षष्ठ्यब्दि विशेषांक, नोव्हेंबर १९७० यातून साभार उद्धृत.

☆☆☆

# बा. भ. बोरकरांचे कादंबरीलेखन

– प्रा. सदा कऱ्हाडे

बा. भ. बोरकर हे सुविख्यात कवी आहेत. टीकाकारांनी एकेकाळी म्हटल्याप्रमाणे बोरकरांनी कविवर्य तांबे यांचे घराणे पुढे चालवले. हे खरे असले तरीसुद्धा बोरकरांच्या कवितेने स्वतःची पृथगात्मता निःसंशय सिद्ध केली आहे. बोरकर अधिकाधिक काव्यनिर्मितीतच सदैव रमलेले आहेत. 'काव्य खावे, काव्य प्यावे, काव्य गावे' अशीच त्यांची वृत्ती सिद्ध झालेली आहे. बोरकरांच्या वृत्तींत प्रवृत्तींत काव्य संपूर्णतया भिनलेले आहे म्हणूनच त्यांचा उल्लेख मुख्यतः कवि बोरकर असाच केला जातो हा उल्लेख मराठी रसिकवाचकांना इतका सुपरिचित आहे की कादंबरीकार बोरकर असे कोणी म्हटले तर कदाचित् वाचकांना ते काहीसे विचित्र वाटेल. परंतु बोरकरांनी काही उल्लेखनीय असे कादंबरी लेखन केलेले आहे. त्यांच्या 'भावीण' या कादंबरीची गुजराथी व कानडी भाषेतही भाषांतरे झाली आहेत. बोरकरांची ही एकच कादंबरी इतकी वैशिष्ट्यपूर्ण आहे की तिच्यांतील एकूण गुणवत्ताच कादंबरीकार या विशेषणाची अर्थपूर्णता पटवू शकेल. परंतु त्यांच्या कवितेवर जेवढे लिहिले गेले तेवढे त्यांच्या कादंबरीवर लिहिले गेले नाही.

'जळते रहस्य' ही त्यांची अनुवादित कादंबरी आहे; पण कादंबरीकार या दृष्टीने त्यांचे वैशिष्ट्य त्यांच्या स्वतंत्र कादंबरीलेखनांतच प्रत्ययाला येते.

'मावळता चंद्र' (१९३८), 'अंधारांतील वाट' (१९४३) व 'भावीण' (१९५०) ह्या त्यांच्या स्वतंत्र कादंबऱ्या; ('जीवनाची हाव', 'संपातीचे पंख' ह्या कादंबऱ्या आगामी प्रकाशने म्हणून घोषित झालेल्या होत्या. प्रत्यक्षात त्या प्रकाशित झाल्या की नाहीत याची माहिती उपलब्ध नाही. असो.)

'मावळता चंद्र' ह्या कादंबरीचे लेखन १९३७ च्या सुमारास झाले. ('मावळता चंद्र' हा भावार्थसंकेत बोरकरांना फार प्रिय असावा. कारण दुसऱ्या कादंबरीत एका प्रकरणाला हे शीर्षक दिले आहे; कविवर्य तांबे मानवी भावनांविषयी नेहमीच निसर्गाच्या परिभाषेत बोलतात. मानवी मनांतील अनेकविध भावानुभवांचे आविष्करण करताना बोरकरही उदात्त व सौंदर्यपरिपूर्ण अशा निसर्गाचीच परिभाषा वापरतात असे मला वाटते.)

एखादा कवी काव्यलेखनाकडून गद्यलेखनाकडे का वळला हा प्रश्न टीकाकारांना नेहमीच काहीसा कोड्यांत टाकणारा असतो. अनुभवाच्या अभिव्यक्तीचे एक माध्यम अपुरे पडले की कलावंत दुसऱ्या माध्यमाचा अपरिहार्यपणे स्वीकार करतो. असेही एक उत्तर या संदर्भात टीकाकारांजवळ असते. अशा काही अपरिहार्यतेमुळे बोरकर कादंबरी लेखनाकडे वळले का? स्वाभाविकच हा प्रश्न उपस्थित होतो. परंतु 'मावळता चंद्र' ह्या कांदबरीच्या प्रस्तावनेतच बोरकरांनी प्रश्नाचे उत्तर देऊन टाकले आहे.

प्रस्तावनेत बोरकर लिहितात, "ही कादंबरी लिहिली म्हणण्यापेक्षा ती लिहिली गेली असे म्हणणे अधिक सार्थ ठरेल. तिच्या निर्मितीच्या मुळाशी हौसेपेक्षा उमाळाच जास्त होता. केवळ हौसेखातर मी या वाङ्मयप्रकाराकडे वळलो असतो की काय याची मला शंकाच आहे...."

हा उल्लेख मला महत्त्वाचा वाटतो. ज्या उमाळयाविषयी बोरकर इतके जिव्हाळयाने बोलतात तो उमाळाच शब्दातीत आहे. परंतु एखादे कथानक त्यांना झपाटून टाकत असावे. कथाविश्वांतील मानवी व्यक्तींच्या भावानुभूतींची अनेकविध कम्पने, स्पंदने बोरकरांच्या कविमनात झंकारत असावीत. त्या झंकारण्यानेच त्या त्या व्यक्तीविषयींचा अतीव उमाळा त्यांच्या मनात दाटून येत असावा. आणि त्या उमाळयानेच ते लिहित गेले असावेत. असे मला त्यांच्या कादंबऱ्यांवरून जाणवते. 'मावळता चंद्र' मधील रजनी विषयींचा उमाळा; 'अंधारांतील वाट' मधील प्रकाशच्या आईविषयींचा उमाळा; 'भावीण'मधील शेवंतीविषयींचा उमाळा; हे सर्व उमाळेच बोरकरांच्या कविमनाला फार फार अस्वस्थ करून सोडणारे होते; भावीणींची समाजात होणारी उपेक्षा पाहून बोरकरांची जाणीव 'अनु-

तप्त' होत असे. अशी अनुतप्तता अस्वस्थतेला अधिकाधिक तीव्र करणारी; 'भावीण' कादंबरीची कथासृष्टी मनात वेगाने तरारली तेव्हा आपण कसे झपाटलो गेलो हे कादंबरीच्या प्रस्तावनेत बोरकरांनी सांगितलेच आहे. अशा झपाटले जाण्यांतच कला निर्मितीच्या 'कळा' असतात. आणि प्रत्यक्ष तसे काही लेखन झाले की कलानिर्मितीचा आनंद असतो. बोरकरांचे कादंबरीलेखन अशा कला निर्मितीच्या आनंदासाठीच आहे.

तरीही मला असे वाटते की बोरकर हे प्रथम कवी आहेत आणि नंतर कादंबरीकार आहेत; सौंदर्यप्रतीती, कल्पनारम्यता आणि मानवी व्यक्तित्वांतील-व्यक्तिमत्त्वांतील उदात्तता ही काव्यात्मप्रवृत्तीची लक्षणे आहेत असे मी मानतो सौंदर्यप्रतीतीमुळे कल्पनारम्यतेच्या अलौकिक विश्वांत मानवी मन अधिकाधिक रमते. आणि असे तद्रूपतेने रमतांनाच मानवीमनाचा कल उदात्तीकरणाकडेच अधिकाधिक झुकतो; वास्तवांतर्गत अनुभवाला कल्पनीय रूप देणे. आणि त्या कल्पनीयाला अखेर उदात्तता प्राप्त करून देणे. हीसुद्धा एक प्रक्रिया कलानिर्मितीत असते.

'वास्तवता म्हणजे वस्तुस्थितिदर्शन नव्हे.' असे एका संदर्भात बोरकरांनी सांगितले आहे. (मावळता चंद्र) ते अन्वयार्थक आहे. वास्तवतेच्या नावाखाली केवळ वस्तुस्थितिदर्शन घडविणे म्हणजे कला निर्मिती नव्हे अशी नि:संशय बोरकरांची श्रद्धा असावी. सौंदर्यप्रतीती, कल्पनारम्यता व उदात्तता ह्यांच्या रसायनांतून शेवटी जे घडेल, जे मूर्तरूप होईल तीच कलानिर्मिती, अशीही त्यांची गाढ श्रद्धा असावी. ही श्रद्धा लक्षात घेतल्याशिवाय बोरकरांच्या कादंबऱ्यांची प्रकृती व प्रवृत्ती समजणार नाही.

'मावळता चंद्र' ह्या कादंबरीतील दियान ही व्यक्ती असा उदात्ततेचा प्रत्यय देते. रजनी, शशांक व दियान ह्यांच्या भावबंधांतून कादंबरीच्या कथानकाची गुंफण झाली आहे. रजनी व शशांक हे विवाहबद्ध झाले आहेत. पण दोघांचाही विलक्षण कोंडमारा होतो. शशांक हा कलावंत आहे. पण रजनीला त्यांच्यातला 'कलावंत' समजत नाही; रजनी आपल्याला समजून घेत नाही म्हणून त्याचा कोंडमारा होतो. आणि या कलावंत पतीला आपण पुरेसा प्रतिसाद देऊ शकत नाही म्हणून रजनीचा कोंडमारा होतो. शशांक मधला कलावंत उमजतो दियानला; दियानचा धर्म आणि संस्कृती शशांकच्या धर्मसंस्कृतीपेक्षा भिन्न आहे. परंतु मना-मनांत अद्वैत साधू पहाते. आणि सामाजिकतेमुळे पुन्हा द्वैतच निर्माण होऊ लागते; 'माताकुमारी'चे चित्र शशांकने काढले. त्या चित्रामुळे त्याला कीर्ती मिळाली. प्रतिष्ठा मिळाली. पण ते चित्र दियानच्या वडिलांच्या मृत्यूला अप्रत्यक्षपणे कारणीभूत झाले. ते चित्र शशांकच्या अपार अगतिकतेला कारणीभूत झाले; ते चित्र ब्राझीलमध्ये दियानच्या वडिलांनी विकत घेतले; चित्राचे श्रेष्ठत्व किंवा स्वकीय कलावंताला साहाय्य म्हणून नव्हे. तर त्यांना त्यांच्या जीवनाचे समाधान लाभले. दियानच्या आईची मनोज्ञ मूर्ती, तिचा काव्यरम्य यौवनकाल त्यांत सामावलेले होते. (दियानला मॉडेल ठेवूनच शशांकने ते काढले होते..) आपली अखेरची भेट म्हणून त्यांनी ते चित्र दियानाला पाठविले. आणि आपली आठवण म्हणून दियानने ते चित्र शशांकला नजर केले. आणि त्याच्या आयुष्यांतून निघून गेली. शशांकच्या भावजीवनात दियानच्या रूपाने चंद्र उगवला होता. काहीकाळ त्याचे जीवन प्रकाशमय झाले पण तो 'मावळता चंद्र' होता. अखेर तो मावळलाच. शापित अश्वत्थाम्याला चिरंजीवित्वाचा उःशाप मिळालेला..... तोच वज्रलेप ठरला.

'मी दुःखाचा राणा आणिक तू ग सुखाची राणी
मरणासम मी अद्भुत, सखि तू चिन्मयजीवनखाणी'

रॉबिनच्या कवितेतल्या या दोन ओळी शशांकच्या भावजीवनाची कथा सांगून जातात.

दियान, दियानचे वडील, शशांक, रॉबिन या सगळ्याच व्यक्ती मानवी कक्षेपलीकडील कल्पनीय अलौकिक जीवन जगू पाहणाऱ्या. ते जगतानाच दारुण शोकांतिकेला सामोरी जाणारी ही माणसे; त्यांच्या भाववृत्ती सर्वस्वी काव्यात्म. आणि त्या काव्यात्मतेला उदात्ततेचा स्पर्श. एखादे स्वप्न मनात आठवणींच्या रूपाने तरळत रहावे तशी दियानची भावमूर्ती सारखी जाणवत राहते.

'अंधारातील वाट' या कादंबरीतील व्यक्तीही अशा कोंडमारा अनुभवणाऱ्याच आहेत. विक्षिप्तपणाने वागणारे डॉक्टर, नवरा कुठेतरी परागंदा झालेला आहे अशी मुलीची समजूत करून देऊन त्याच्याचसाठी जगणारी प्रकाशची आई. दुर्दैवाने फसलेल्या स्त्रियांसाठी सुतिकागृह

चालविणारी. त्याच सूतिकागृहांत प्रकाशकडून प्रमाद झाल्यामुळे गरोदर राहिलेल्या असहाय्य मुलीचे बाळंतपण. प्रकाशच्या भावी वधूला–मृदूलेला त्या नूतनबाळाचा स्वीकार करण्याचा झालेला मोह. डॉक्टर आणि प्रकाशची आई यांचे परस्परावर प्रेम असूनही आणि मृत्यूसमयी तिच्या पतीने दोघांचे हात एकमेकांच्या हातात दिलेले असूनही त्यांनी कधी मोहाला आमंत्रण दिले नाही. डॉक्टर विक्षिप्त-पणे वागत राहिले आणि प्रकाशची आई अंधारांतील वाट चालत राहिली. हातून काहीना काही पापं घडलेली ही माणसे. तसे एका अर्थी लौकिक जीवन जगणारी. पण एका पापाच्या परिमार्जनासाठी त्यांनी दुसरे पापं केले नाही. पापालाही ते निर्भयपणे सामोरे जातात. आयुष्यात मोठी ध्येये उराशी बाळगून निष्क्रिय होऊन राहण्यापेक्षा प्रांजलपणे येईल ते जीवन जगत रहाणे शतपटीने चांगले. अशा समजंसपणाची ही माणसे आहेत. त्या समंजसपणामुळेच डॉक्टर आपले पूर्वायुष्य सांगतात. प्रकाशची आई आपले 'अंधारातलं' जीवन सांगते; विलास (प्रकाशचा मित्र) त्याच समंजसपणाने विजयाशी (जिने प्रकाशचा गर्भपोटांत वाढवला) विवाहबद्ध होण्यास तयार झाला. आणि त्याच समंजसपणाने मृदूला नूतन बाळाचा स्वीकार करण्यास स्थिर झाली. या समंजसपणामुळेच शेवटी ह्या सर्व व्यक्ती मानवी कक्षेपलीकडच्या वाटू लागतात.

'मावळता चंद्र' ही कादंबरी जितकी काव्यात्म आहे तितकी 'अंधारातील वाट' नाही; पहिल्या कादंबरीत व्यक्तींच्या भावजीवनाचे मनोज्ञ दर्शन घडविण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. तर दुसऱ्या कादंबरीत व्यक्तींच्या जीवनातील स्थूल घटनांचे निरूपण लेखकाने केले आहे. त्यामुळे स्वाभाविकच पहिल्या कादंबरीला आत्मपरतेचे (Subjectivity) अधिष्ठान लाभले तर दुसऱ्या कादं-बरीला वस्तुपरतेचे (Objectivity) अधिष्ठान लाभले; घटनांची गुंतागुंत दुसऱ्या कादंबरीत अधिक आहे. भाव-दर्शनांत जी उत्कटता पहिल्या कादंबरीत साधली ती दुसऱ्या कादंबरींतील घटक निरूपणांत स्वाभाविक साधली नाही; पहिल्या कादंबरीच्या निर्मितीमागे जो तीव्र उमाळा जाणवतो तो दुसरीत जाणवत नाही; बोरकरांच्याच शब्दात सांगायचे तर पहिली कादंबरी लिहिली गेली. दुसरी त्यांनी जाणीवपूर्वक लिहिली; दुसरीसाठी कदाचित् त्यांना फडके-खांडेकरांप्रमाणे सामान्यांतून असामान्य असे कथा-नक घडवावे लागले; म्हणून पहिल्या कादंबरीतील सहजता दुसऱ्या कादंबरीत जाणवत नाही रचनेच्या दृष्टीनेही दोन्ही कादंबऱ्यांत फरक आहे. पहिल्या कादंबरीत प्रकरणांना शीर्षके तशी नाहीत. त्या त्या पात्रांची नावे आहेत. (रजनी, शशांक, दियान, रॉबिन वगैरे) कारण घडणाऱ्या 'घटनांच्या' भावनात्मक प्रतिक्रिया त्या त्या व्यक्ती आंतरिक उमाळ्याने बोलून दाखवितात; त्यांतून कादंबरी आकार घेते; दुसऱ्या कादंबरीत प्रकरणाला शीर्षके आहेत. ('अवेळी आलेले पत्र', 'स्फोट', 'आंदोलने' वगैरे) मला असे वाटते की दुसरी कादंबरीही पहिलीसारखीच पात्रांच्या आत्मनिवेदना-त्मक पद्धतीने लिहिली असती तर ती अधिक काव्यात्म व परिणामकारक झाली असती.

पहिल्या कादंबरीत बोरकरांचे कादंबरीलेखनाचे सामर्थ्य चांगलेच जाणवते; दुसरी कादंबरी वाचल्यावर क्षणकाल वाटते की बोरकरांना कादंबरीलेखन जमणार नाही. परंतु 'भावीण' कादंबरी वाचल्यानंतर पुन्हा असे वाटते की बोरकर हे काव्याइतकेच कादंबरीलेखनही प्रत्ययकारी करू शकतात.

'भावीण' ही कादंबरी बोरकरांच्या लेखन वैशिष्ट्यांची सर्वत्र गुणवत्ता प्रगट करणारी कादंबरी आहे. हे म्हणणे अतिशयोक्तीचे नाही. प्रस्तुत कादंबरीतील व्यक्तिचित्रणे-सुद्धा उदात्त पातळीवर मानीव कक्षेपलीकडील जीवन जगू पाहणारी आहेत. परंतु कथानकाचा अवाका खूप मोठा आहे. 'शेवंती'च्या आत्मसमर्पणाची ही कथा. तशीच ती हृषीच्या भावजीवनाची कथा आहे. केशवच्या ध्येयवादी जीवनाचीही ही कथा आहे. रवळूदादांच्या धार्मिक, कर्मठ, सनातनी प्रवृत्तीच्या पराकोटीची ही कथा; प्रत्येकांच्या व्यक्तिजीवनांतले भावनिक संघर्ष कादंबरीत शब्दांकित होतात तसेच सामाजिक जीवन-संघर्षालाही एकप्रकारचा हुंकार प्राप्त होतो; महात्मा गांधीच्या हरिजनोद्धार चळवळी-तून प्रेरणा घेऊन ध्येयवादी केशव हरिजन वस्तीत प्रत्यक्ष कार्य करतो; समाजाच्या धार्मिक व सांस्कृतिक जीवनावर 'धर्मपीठा'चा विलक्षण प्रभाव होता; म्हणून एकीकडे त्याच्या समाजकार्यामुळे नवजागृती होत असतानाच दुसरी-कडून त्याला होणाऱ्या विरोधांचे स्वरूपही तीव्र होत








असते. पण त्या विरोधाला न जुमानता निर्भयपणे तो कार्यरत रहातो. शिकून पदवीधर झालेल्या 'हृषी'कडून त्याच्या खूप अपेक्षा असतात. त्याच्या कार्यात मदतच होणार असते. पण हृषीला 'वेड्या'चा झटका येतो. त्याच्यावर मानसिक आघात होतो. डोक्यावर परिणाम होतो. या आगळ्या संकटांतून त्याचा 'पुनर्जन्म' होणे आवश्यक असते. काम अतिशय अवघड व नाजूक पण केशवावरील निष्ठेने ते काम शेवंती पत्करते. देवीची 'कांचोळी' झालेली शेवंती एकाअर्थी दिव्यत्वाला पोचलेलीच असते. तिनेच शेवटी हृषिसाठी सर्वप्रकारचे दिव्य केले.

समाज जीवनातील संघर्षाला हुंकार लाभलेला असूनही ही कादंबरी सामाजिक नाही; सामाजिक संघर्षामुळे व्यक्तीच्या भावजीवनांतील भावनिक संघर्ष अधिक तीव्र होतात. आणि संघर्षणांतून उजळून जाणाऱ्या व्यक्ती, उजळून जाणाऱ्या व्यक्ति जीवनाचेच दर्शन कादंबरीत घडते; संघर्षमय जीवनांतून व्यक्ति तरून जातात केवळ आत्मिक बळावर आणि प्रत्येकाचे आत्मिक बळ जणू इथे पणाला लागते. आणि आत्मिक बळालाही अधिष्ठान लाभते असीम त्यागाचे. शेवंतीचा त्याग, रंजनेचा त्याग, हृषीच्या आईचा त्याग; त्यागाच्या परी व्यक्तिपरत्वे भिन्न आहेत. पण सगळ्याच व्यक्ति कशा अधिकाधिक उजळ होत जाणाऱ्या आहेत.

सौंदयप्रतीती, कल्पनारम्यता व उदात्तता यांचा मनोज्ञ समन्वय या कादंबरीत परमोत्कर्षाला पोचतो. बोरकरांच्या काव्यात्म भाषाशैलीचे सामर्थ्य प्रत्ययाला येते.

'दिव्यत्वाची जेथ प्रचीति। तेथे कर माझे जुळती।'

अशी एक सुभाषितरूप ओळ बोरकरांची प्रसिद्ध आहे. सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनाच्या संदर्भातच लौकिक जीवन जगणाऱ्या व्यक्तींच्या जीवनांतल्या दिव्यत्वाची प्रचीती कलावंताच्या दिव्य दृष्टीने बोरकर घेतात. आणि तीच प्रचीती रसिक वाचकांना देण्यासाठी जणू कादंबरी लेखन करतात.

दियानच्या जीवनांतील दिव्यत्वाची प्रचीती, डॉक्टर व प्रकाशच्या आईच्या जीवनांतील दिव्यत्वाची प्रचीती आणि शेवंतीच्या जीवनांतील दिव्यत्वाची प्रचीती.

कुसुमावती देशपांडे ह्यांनी असे म्हटले आहे 'भावीण' कादंबरीच्या संदर्भात, ".... व्यक्तिचित्रण अखेर मानवी कक्षेच्या पलीकडे जाते. कथेचा उत्तररंग अतिसुंदर, अति उदात्त करण्याच्या खटपटीत पूर्वरंगांतील मानवी चित्रणाचा काहीसा बेरंग होतो."

पूर्वरंगात मानवी चित्रण आणि उत्तररंगात अतिसुंदर, अतिउदात्त चित्रण असा प्रकार तिन्ही कादंबऱ्यांत जाणवतो. परंतु तीच बोरकरांच्या कादंबरीची प्रकृती आहे. 'आख्याना' चा उत्तररंगच परिणामकारक असावा लागतो. बोरकरांच्या कादंबऱ्यांची परिणामकारकता उत्तररंगावरच अवलंबून आहे. कारण उत्तररंगांतच व्यक्तिजीवनांतील दिव्यत्वाची प्रचीती बोरकर घडवतात. व्यक्तिचित्रणे मानवी कक्षेपलीकडे जाऊ लागतात. त्याच क्षणी की ज्याक्षणी दिव्यत्व प्रत्ययाला येऊ लागते.

बोरकर हे जीवननिष्ठ कलावंत आहेत; जीवननिष्ठ कलावंताच्या बाबतीत स्वतंत्र सामाजिक निष्ठांचा विचार अप्रस्तुतच ठरतो; जीवनांतील सौंदर्यमूल्यांवर बोरकरांची श्रद्धा आहे; जे सुंदर आहे तेच शिव आहे आणि जे शिव आहे तेच सत्य आहे. अशा श्रद्धेची जपणूक करणारा हा कलावंत आहे. मानवी जीवन हे उदात्त व सौंदर्यपूर्ण आहे. कलावंताच्या दिव्यदृष्टीला ही उदात्तता आणि हे सौंदर्य दिसावे लागते. बोरकरांना ते निःसंशय दिसते. म्हणूनच या दोहोंचे एक दिव्य रसायन करून ते कादंबरी लिहितात. म्हणूनच त्यांची व्यक्तिचित्रणे अपरिहार्यपणे असामान्य ठरतात. अतिसुंदर व अतिउदात्त करण्याची खटपट बोरकर करतात हे म्हणणे रास्त नाही. 'वास्तवांतर्गत कल्पनीया' वरच त्यांची निष्ठा असल्यामुळे ती त्यांची लेखनप्रवृत्तीच झाली आहे.

'भावीण' कादंबरीत शेवटच्या प्रकरणांत काही वाक्ये आहेत. "आईबाप, कुटुंब, समाज, पूर्वस्नेह या सर्वांना तुडवून स्वीकारलेले प्रेम स्वतःच्याच शापाने दग्ध होते आणि आध्यात्मिक संपत्ती गमावून बसते. समाजांत सुधारणा झाली पहिजे. पण ती लादून झगडून होत नाही. त्यासाठी त्याचा हृदयपालट केला पाहिजे आणि तो शुद्ध त्यागालाच करणे शक्य आहे...."

मला वाटते यावर भाष्य करण्याची आवश्यकता नाही. बोरकरांच्या जीवननिष्ठांचे सार ह्या काही वाक्यांत सामावले आहे. आणि त्यांच्या कादंबऱ्या अशा निष्ठेतूनच लिहिलेल्या आहेत.

बोरकरांच्या कादंबऱ्या प्रादेशिक आहेत, असे अनेक टीकाकार म्हणतात. 'प्रादेशिक' हे विशेषण वाङ्मयाचा निकष होऊ शकतो का? हा विवाद्य प्रश्न आहे. परंतु एका कादंबरीच्या प्रस्तावनेत बोरकरांनीच स्पष्टपणे लिहिले आहे, 'गोमंतकचे सामुदायिक जीवन आज कित्येक शतके इतर महाराष्ट्राहून निराळ्या रीतीने घडत गेल्याने त्याला पुष्कळच वेगळेपणा व त्याबरोबर वैशिष्ट्य ही प्राप्त झाली आहेत. हाच गोमंतकीय कथालेखकाच्या अवलोकनांतला आत्मीय भाग झाल्यामुळे त्याचेच चित्रण प्रामुख्याने केले जाते. केवळ या वैशिष्ट्यावरून गोमंतकीय कथावाङ्मय प्रादेशिक ठरत असेल तर जगांतील सगळे वाङ्मय प्रादेशिक म्हणावे लागेल..."

म्हणून हाही प्रश्न मला गौण वाटतो.

'भावीण' ही एक हृदयकथा आहे. असे बोरकरांनीच लिहिले आहे.

हृदयकथा म्हणजे नेमके काय? पुन्हा एक प्रश्न उपस्थित होतो. त्याचे सविस्तर उत्तर प्रस्तुत लेखाच्या संदर्भात अप्रस्तुत ठरेल.

परंतु मानवी 'हृदयांतील' सौंदर्यभावना, उदात्तता, दिव्यत्व, त्यागवृत्ती या सर्वांचे आपल्यापरीने मनोज्ञ दर्शन घडविणे ही बोरकरांच्या कादंबऱ्यांची एक लक्षणीय प्रवृत्ती आहे असे मला वाटते.

**टीप :** मांडवी : कवि बा. भ. बोरकर षष्ठ्यब्दि विशेषांक, नोव्हेंबर १९७० यातून साभार उद्धृत.

☆☆☆



अनुक्रमणिका

# 'जपानी रमलाची रात्र' : प्रतिभेची जादू

– प्रभा गणोरकर

स्त्रीविषयक आकर्षणाचे प्रीती आणि रती हे दोन्ही भाव बोरकरांच्या कवितेत उत्कटपणे आणि नि:संकोचपणे व्यक्त झाले आहेत. 'ऊर्वशीच तू जाया' किंवा 'पाठमोरी पौर्णिमा' या कवितांमधून स्त्रीशरीराचे सौंदर्य आणि त्याच्या दर्शनाने मनात जागणारी अनावर ओढ व्यक्त झाली आहे. या कवितांमध्ये ती स्त्री आणि तिचे शरीर प्रत्यक्ष समोर आहे, ते मनात रतिभावना निर्माण करते आहे. 'जपानी रमलची रात्र' प्रारंभी या कवितेत मनात रती निर्माण करील असे स्त्री शरीर समोर नाही. पण मन रतिभावनेने आधीच विभोर, आतुर आहे. त्या भावनेने भोवतालच्या वस्तू आहेत त्याहून सुंदर वाटताहेत. केवळ सुंदर नव्हेत, आवाहक, शृंगारात, रतिक्रीडेला उत्सुक करणाऱ्या. तसे रत्युत्सुक रूपच त्या धारण करताहेत. कवितेतील 'तो' – पुरुष 'तिच्या' शयनमहालात बसलेला आहे. त्याच्या हातात 'म्यूसे'च्या कवितांचे पुस्तक आहे. हातात सिगरेट आहे. मनातल्या मनात तो तिची वाट पाहातो आहे. या आतुर क्षणांच्या अवकाशात भोवतीच्या वस्तूही. त्याचे रूप बदलतात, गूढ, भारित होतात. शयनगृहातला आपला नेहमीचा विजेचा 'निळ्या रंगाचा नाइट-लॅम्प' जणू दीपराग गाणारे 'चांदपाखरू' बनतो.

'तुझे विजेचे चांदपाखरू दीपराग गात
रचीत होते शयनमहाली निळी चांदरात'

'तो' उद्दीपित असल्यामुळे शयनगृहाच्या सजावटीचा भाग म्हणून कोपऱ्यात ठेवलेले (प्लस्टिकच्या लहान) कुंडीतले माडाचे (लहानसे) झाड, 'रतिरत कोंबड्या'सारखे त्याला दिसते आहे. कोपऱ्यात सुगंधासाठी धूप लावलेला होता तो 'उसासत' होता, भिंतीवर लावलेली रेशमांनी विणलेली चित्रे 'गात्रांमध्ये रसावलेली' वाटत होती. दुसऱ्या कोपऱ्यात ठेवलेला तिचा पियानो (जणू जळात निजलेला यक्ष) तिच्या स्पर्शाच्या सुखांची स्वप्ने पाहात शांत होता. तो शयनगृहात बसलेला असतानाचे हे वातावरणच असे झाले आहे. तो म्यूसेची कविता वाचतो आहे, हातातली जळती सिगरेट, धुराच्या रेषा वेलीसारखी वळत होती नि मनात तिच्यासह 'काही' जळत उसासत होते.' तिचा छोटा लोकरी कुत्रा पायाशी घोटाळत होता.

कवितेच्या सुरुवातीच्या चौदा ओळीत प्रसंगाचे वातावरण उभे झाले आहे. या प्रसंगाची नायिका अजून प्रत्यक्ष रंगमंचावर अवतरलेली नाही. या कवितेतली सर्व खुमारी त्याच्या या 'वाटण्यात' आहे. घडत काहीही नाही. फक्त उद्दीपित मनोऽवस्थेमुळे त्याला तसे वाटते आहे. तिची आतुरतेने वाट पाहात बसलेला असताना तिच्या (रेशमी–सॅटिन–च्या) पोशाखाची सळसळ ऐकू आली. तिच्या सपातांचाही आवाज आला. शयनगृहाची सजावट, हाताशीच असणारे कवितेचे पुस्तक, कोपऱ्यात पियानो, पायाशी कुलुंगी कुत्रा या साऱ्या थाटावरून तिची 'रसिकता' सूचित केली गेलीच आहे. पायात सपाता घातलेली, रेशमी पायघोळ वस्त्र परिधान केलेली 'ती' येते ती हातात पेयाचे पेले घेऊनच. ते पेले गोल, फुगीर आहेत, (वाईनचे असणार) ते त्याला 'स्तनाकार' वाटतात. ते पेलेही 'खिदळत' आले आहेतसे त्याला वाटते आणि त्यातले द्रव्य? ते जळता गंधक आणि उकळती पाचू यांचे विलक्षण मिश्रण आहे. पाहिल्याक्षणी धुंदी चढणारे, अद्भुत रंगाचे रसायन त्या पेल्यांत दिसते. एकमेकांचे अभीष्ट चिंतून ('चिअर्स'!) पेल्यांचे काठ एकमेकांना भिडवले जातात.

येथपर्यंत प्रत्यक्ष रत्यनुभवाचा उल्लेख नाही. खरेतर तो पुढेही नाही. परंतु बोरकरांनी सारे वर्णन असे केले आहे की 'तो' प्रत्यक्ष रत्यनुभवच घेतो आहे.

'स्पर्शे तुझिया आणि पियानो थरारला सारा
मजसम त्याच्या कानशिलांच्या झणाणल्या तारा'

वास्तविक पाहाता, हा स्पर्श 'त्या'ला झालेला नसून पियानोला झालेला आहे. त्या स्पर्शाने पियानो थरारला आहे आणि ('माझ्या'सारख्याच) त्याच्या (ही) कानशिलांच्या तारा झणाणल्या आहेत. क्षणभर वाटले की










अनुक्रमणिका

आकाशातून गंधर्वकन्यांनी जणू पुष्पवृष्टी केली आहे. हृदय मदाचे मोहळ होऊन दृष्टी जडावली. तिच्या केसातले (ज्या पिना लावलेल्या आहेत त्या बहुधा माशांच्या आकाराच्या असाव्यात) मासे पोहू लागल्यासारखे भासले आणि अंगातल्या गंधाने हवाही जड झाली. शेज (शयनमहालातील पलंग) नौकेसारखी तरंगत डुलू लागल्यासारखी भासू लागली, तिच्या कांतीतून समुद्राच्या फेनाचे तेज निथळू लागले, नखे (ती पियानो वाजवते आहे, हसते आहे, तिचे डोळे चमकताहेत) दात, डोळे (समुद्रातील) रत्नांप्रमाणे भासू लागले. (या पाच ओळीत समुद्राशी निगडित तपशील वापरले आहेत) तिचे अवयव मयवनातील वेताप्रमाणे चिवट, लवणारे; तिचे तारुण्य कात टाकलेल्या नागिणीसारखे, विळखे घालीत ज्वालेची गीते आलपीत आहेसे वाटणारे. हे सारे वातावरण, ती मोहक, मादक सौंदर्याची पुतळीच अशी तरुणी, ते हिनकळणारे, खिदळणारे पेले, तो झणझणणारा पियानो-जणु (याच्या) डोळ्याला पट्टी बांधून मायावी जीवन (त्याच्याशी) (आंधळ्या कोशिंबिरीचा) खेळ खेळते आहे त्याला चकवते आहे, फसवते आहे, हुलकावणी देत आहे, मागचे पुढचे काही कळेनासे झाले आहे, जणु (त्याला वाटते), तिच्या (जपानी – हे सारे वर्णन कुण्या गैशाच्या शयन-गृहातील आहे –) भाषेसारखीच तिची अगम्य सुंदरता अगदी जवळ–अगदी हाताशी असूनही – हाती मात्र आली नाही. दुर्लभच राहिली. (येथे रत्युनभव प्रत्यक्षात घेतला गेलेला नाही हे स्पष्टच दिसते)

पण त्या रमलची (जादूटोण्याची – जे नाही ते दाखवणारी – भासवणारी) रात आजही आठवली, (तिला अजूनही शोधत असताना) की मधाची, गोड – पण तीक्ष्ण जखम काळजात झाल्यासारखे वाटते – अगदी आरपार.

एक कमालीचा तरल, उत्कट, थरथरता भावानुभव बोरकरांनी अक्षरशः तसूतसूने चढवीत शब्दबद्ध केलेला आहे. त्यांच्या प्रतिभेच्या जादूने सारा अनुभव विलक्षण मायावी – नसूनही असल्यासारखा–बनलेला आहे!

☆☆☆



अनुक्रमणिका

# झाडे झाली निळीनिळी

– प्रा. कृष्णा चौधरी

आजचा काळ काव्यचर्चेचा आहे. अभिजात काव्याच्या स्वरूपापेक्षा काव्यचर्चेची धूळच खूप उडालेली दिसून येते. बा. भ. बोरकरांची कविता या विधानाला अपवाद ठरावी. काव्याच्या क्षेत्रात नव्या जाणिवा असल्या पाहिजेत अशी आग्रही विचारसरणी आली. दुर्बोधतेची चर्चाही झाली. पण पु. शि. रेगे, बा. भ. बोरकर इ. कवी या प्रवाहात कधी सापडले नाहीत. सभोवतीच्या गदारोळातूनही त्यांनी आपला प्रातिभधर्म स्वयंभूपणे जपला म्हणूनच या कवींची कविता सौंदर्यानुभूतीच्या चैतन्यव्यूहात भ्रमण करीत राहिली. बाकीबाब बोरकरांची कविता 'सचैल गोपी न्हाल्या ग' सारखी सौंदर्यानुभूतीच्या हिमवंतीच्या सरोवरात सचैल स्नान करीत आहे.

आपण कवितेचे सामाजिक, राजकीय, निसर्गविषयक, गूढगुंजनात्मक व आध्यात्मिक असे वर्गीकरण करतो. अशा ठोकळेबाज वर्गीकरणामुळे कवितेचे कवितापणच (तिची सौंदर्यानुभूतीतील लयबद्धता) संपुष्टात येते. केशवसुतांच्या कवितेतील सामाजिक जाणिवांचे कौतुक करताना, तिच्यातील स्वयंभु, अभिजात सौंदर्यानुभूतीचा सृजनशील प्रातिभधर्मामुळे आविष्कृत होणारा लयबंध-कैवल्यपूर्ण मूल्यभाव दुर्लक्षिला जातो. कवितेचा निकष ठरविताना तिचा प्रातिभधर्मातून जन्मलेला लयबंध विचारात घेणेही महत्त्वाचे आहे.

बोरकरांचा काव्यपिंड, त्यांचा प्रातिभधर्म ताम्ब्यांप्रमाणे संगीतानुकूल स्वररचना करणारा सौंदर्यवादी आहे. भावानुभूतीतील पद्मबंध, लय पाकळीपाकळीने उमलत जाऊन पूर्णविकसित गेंददार कमलदळात तिचे रूपांतर कसे होते हे कळतही नाही. त्यांच्या कवितेत मर्ढेकरासारखा विराट जीवनानुभव नाही. मुक्तिबोधांच्या कवितेत व्यक्तीमन व समाजमन यात सुरू असणारी तळमळ, द्वंद्वात्मक पातळीवर दिसून येते, तशी उत्कट व आर्त तळमळ नाही. बाकीबाब बोरकरांच्या कवितेत आहेत. संवेदनांच्या स्वरसंगीताने भारलेल्या प्रतिमा. पु. शि. रेगे जसे शारीरसंवेदनांच्या प्रतिमा शब्दबद्ध करतात, तसे बोरकरही नादसामर्थ्याने भारलेल्या प्रतिमातून सौंदर्यानुभव दृग्गोचर करतात. बोरकरांचा काव्यपिंड बालकवी व भा. रा. ताम्बे यांच्या काव्यपिंडावर पोसलेला आहे. तरी बोरकरांची कविता ही त्यांचा स्वतंत्र प्रतिभाधर्म चोळाखीत आहे. आशय व शैलीचे वरवरचे अनुकरण इथे दिसत नाही. श्रेष्ठ प्रतिभाधर्माचा कवी आपली परंपरा पचवून नवे रसायन कवितेतून मांडतो. ताम्ब्यांच्या कवितेने बोरकर प्रभावित झाले खरे. या दोन्ही कवींच्या आविष्कार पद्धतीत-धारणीत-घाटात साम्य आहे. अमृतघट, अमर सुंदरता, जन म्हणती सावळी तुज सगळे, आज तुझ्या घरी आल्ये, मी अशांत प्रवासी इ. कविता ताम्बे वळणाच्या दाखवता येतील. पण इथले अनुकरण शैलीचे नसून ते सौंदर्यानुभूतीचे अनुकरण आहे. ताम्बे यांच्याविषयीचा आदर बोरकरांनी 'कवीवर भास्कर गावा' या शब्दात व्यक्त केलेला आहे. उत्कृष्ट कवितेत जुनी सनातन (नित्यनूतन) परंपरा पचवून समकालीन जाणिवांचे प्रतिबिंब प्रतिमांकित झालेले असते. बोरकरांची कविता प्राचीन परंपरा पचवून सौंदर्यानुभूती लयबंधातून–कैवल्यपूर्ण मूल्यभावातून व्यक्त करते, यामुळे तिच्यात महात्मता आलेली आहे.

बाकीबाब बोरकरांची कविता सौंदर्यवादी कविता असून आपली भावानुभूती ती सौंदर्यानुभूतीच्या मूशीतून आत्मनिष्ठा, भावात्मक तादात्म्यातून व रचनासौरभ्यातून शब्दबद्ध करते. बोरकरांच्या कवितेतील शारीर संवेदनांच्या प्रतिमांतून व्यक्त होणारा सौंदर्यप्रत्यय कधी पु. शि. रेगे यांच्या सौंदर्यानुभावातून व्यक्त होतो. आपल्याला आलेला शारीर–मानस अनुभव 'जपानी रमलाची रात्र' या कवितेत प्रसरणशील, अन्वयात्मक शब्दातून कवी व्यक्त करतात

**रतिसुख कुकुटसा कुंडीवर आरोहुनि माड**
**चोंच खुपसुनि फुलवित होता स्वप्नांचे झाड**
**करांतुनि तव खिदळत आले स्तनाकार पेले**
**जळता गंधक पांच उकळती यांहि रंगलेले**







अनुक्रमणिका

बोरकरांच्या नेत्रमीलन, हृदयनिवेदन, प्रणयमुग्धेस, येई सखी, माझी प्रीत, कवण तू, निरोप, फसवणूक, आपण दोघे लहरी गं, राजाराणी, भर सखी भर, पुनश्च ओंजळ, जन म्हणोत तुज दुसऱ्याची गं, तुझे आगमन, घरांतले चांदणे, प्रीति तुझी, लाव दिवा, सोळा वर्षानंतर, रातनिळी रातनिळी, तसेच उत्तररात्र इ. कवितात प्रेमभावनेच्या विविध छटा आत्मनिष्ठा, भावात्मक तादात्म्य व कैवल्यपूर्ण मूल्यभावातून या निर्मितीप्रक्रियेतून उदयाला आलेल्या आहेत. इंद्रियसंवेदनांचा दृक्‌संवेदनांचा सौंदर्यपूर्ण अलौकिक प्रत्यय बांकीबाब अर्थग्रंथीच्या व्यंग्यार्थातून देतात.

**डोळे तुझे बदामी देती मला सलामी**
**त्यानेच हा असा मी झालो गडे निकामी**
**लागे न चित्त धामी लागे न चित्त कामी**
**डोळे लबाड लुच्चे डोळे तुझे बदामी**

या ओळी वाचून माधव ज्युलियन यांच्या गझलांवलीतून सौंदर्यानुभवाचे स्मरण होते.

प्रीतीभावनेची सफलता बोरकर अन्वयात्मक प्रसरण-शील शब्दातून सांगतात :

**कल्पकल्पवर विलास करूनी**
**लाटावर करू प्रवास ग**
**फेनापरि दशदिशांस उधळू**
**हृद्‌सुमनांचा सुवास ग!**

कधी प्रेमवैफल्य आले तर बोरकर म्हणतात :

**मंद असावे जरा चांदणे,**
**कुंद असावी हवा जराशी**
**करूणा भरत्या मुकाटपणी**
**अन्‌ तुला धरावे जरा उराशी**

'श्यामा' या कवितेत शारीर-संवेदनांच्या प्रतिमातून कवी सौंदर्यानुभूतीच्या पातळीवर कलात्मक अनुभव सच्चा निर्मितीप्रक्रियेतून शब्दबद्ध करतो.

**तू आलिस पेलित अंगी वेल विजेची**
**अधरावर झेलित अमृतकोर विजेची**
**घनकुटिल कुंतली गुंतवुनी स्मरसेना**
**पापण्यांतुनि अन्‌ सिंचित धुंद निजेची**

तिच्या जाण्याने कवी अंतःर्मुख एकाकी व असहाय्य नि अगतिक झाला. त्याच्या जीवाचा नुसता थरकाप उडाला त्याची ही आर्त, उत्कट, हळवी संवेदनउत्कटता बोरकर रेखाटतात.

**त्या क्षणे आज परि तरारले कडुनिंब**
**या साकळल्या जळि थरथरले विधुबिंब**
**भिंतीवर श्यामल लसलसत्या दंववेली**
**अन्‌ हिरवळ झाली दवात ओलीचिंब**

'उत्तरसत्ती' या कवितेतही कवीने असाच स्पंदनशील अनुभव शब्दबद्ध केलेला आहे. एका मध्यरात्री कवीला आपल्या प्रेयसीचे उत्कट स्मरण झाले.

**कापुरसा सखि ये अंगलट तुझ्या गावचा वारा**
**झोंबुनि आणि नयनी पाणी अंगी आणि शहारा**

हृदयाच्या तारा झंकारतात. विरहार्त मन किंचाळून उठते.

**वाघिणशी ही गाडी जाते टाकून तुजला मागे**
**तिच्या वाढत्या वेगासरशी आग जिवाला लागे**
**प्राक्तन आहे विणीत माझ्या भवितव्याचे धागे**
**तुझ्याचसाठी शाल सखे ती. नीज नीज नीज सुमनांगे!**

वळवाच्या पावसासारखे क्षणिक कवीच्या जीवनात तिचे आगमन झाले. 'रात निळी रात निळी' या कवितेतील शब्दकळेत भावानुभूतीचे लयबद्ध स्वरसंगीत आहे.

**पोटातून गंध सुटे। ओठातून ध्वनि उमटे**
**तेजाने मन विनटे। निटिलि फुले दीपकळी**

कवीची गात्रागात्रातून संवेदनेद्वारे विश्वसंवेदना पिण्याची पिपासा यातून व्यक्त होते. विरही जीवनानुभव व्यक्त करण्यापेक्षा मीलनाचा अद्वैत आनंद चित्रण करणे कठीणच. बोरकरांच्या कवितेत विरही क्षणाइतकेच मीलनोत्सुक आनंदाच्या क्षणांचेही चित्रण आहे. बोरकरांनी स्वतः म्हटल्याप्रमाणे ताम्बे यांच्या गायकीची परंपरा पुढे चाल-विली. नादाने भारलेल्या, संगीतगर्भ शब्दकळेने इंद्रियसंवेद्य पातळीवर विहार करणाऱ्या आशयगर्भ दृक्‌प्रतिमांनी त्यांच्या कवितेतील सौंदर्यानुभव लयबंधाच्या पाकळी-पाकळीतून फुलत जातो. 'क्षितिजी आले भरते ग' व 'सरिवर सरी आल्या ग' या कविता या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत. बा. भ. च्या कविता भावानुभवांच्या लयबद्ध संघटनेचा, सौस्थ्याचा प्रत्यय त्या देत जातात. संगीतगर्भ भावानुभवांची नादमधुर शब्दकळा या कवितातून सौंदर्या-नुभाचा रचनाव्यूह उलगडत जाते. भावानुभूतीचे मध्यवर्ती केंद्र अन्वयात्मक शब्दातून उलगडत जाते. ही संगीतगर्भ

शब्दकळा सूचकतेतून अर्थाची अनंत वलये विस्तारीत जाते.

**क्षितिजी आले भरते ग**
**घनात कुंकुम झरते ग**
**झाले अंबर। झुलते झुंबर**
**हवेत अत्तर तरते ग**
**लाजण झाली धरती ग**
**साजण काठावरती ग**
**उन्हात पान, मनात गान**
**बोलावून थरथरते ग**

'सरिवर सरी आल्या ग' या कवितेतील सौंदर्यानुभूती कवीच्या साधारणीकृत प्रतीतीतून वैश्विक झालेली आहे.

प्रीतीच्या अद्वैतनिष्ठेचा प्रत्यय कवीला येतो. 'गोपी दुधाच्या धारा ग' अशा शब्दात इथे निसर्गातील घटक चैतन्यरूप लयबंध धारण करतात. येथील लयबंध आपोआप चैतन्यरूप परिघात रूपांतरीत होतो.

**सरिवर सरी आल्या ग**
**सचैल गोपी न्हाल्या ग**
**गोपी झाल्या भिजून चिंब**
**थरथर कापति निंब कदंब**
**घना—मनांतून टाळ—मृदुंग**
**तनूत वागवि चाळ अनंग**
**पाने पिटति टाळया ग।**
**सरिवर सरि आल्या ग।।**

बोरकरांची कविता जीवनानुभवातील सौंदर्यानुभूतींचे क्षण दृक्, गंध, स्पर्श व श्रुती संवेदनांच्या प्रतिमातून सौंदर्यानुभूती साकार करते. आत्मनिष्ठा, ज्ञानात्मक किंवा भावात्मक पातळीवर कैवल्यपूर्ण मूल्यभावातून ती पाकळीपाकळीने उमलत जाते. व्यक्तिगत प्रीती इथे साधारणीकरणातून – व्यंग्यार्थातून वैश्विक पातळीवर अवतरते. कलावंताच्या भावनासंगती रचनेची सांगड विश्वरचनासंगती-सौंदर्याशी सहज साधली जाते.

**जखम अंतरी घेऊनिया मी हसत चाललो पुढे**
**वेदनेतुनि वात्सल्याच्या विशाल क्षितिजाकडे**

बोरकरांची कविता मानवी जीवनानुभवांच्या वात्सल्यातून मानवी जीवनाचा प्रदीर्घ प्रवास करीत आहे. त्यांच्या प्रातिभस्पर्शाने व्यंग्यार्थमय शब्दबंधातून सृजनाचे झरे त्यांना गवसत आहे. मानवी जीवनातील चिरवेदनेतूनच त्यांच्या कवितेची मेंदी रंगत जाणार आहे. आपल्या निर्मितीप्रक्रियेशी प्रामाणिक राहून सृजनाचे नवे नवे घाट ती निर्माण करीत आहे. दुःखातून सृजनाचे दर्शन तिला होत असते.

**जळण्यातहि सुख आहे ज्वालांतुन फुलण्याचे**
**ढळण्यातहि गूज आहे हित अंतिम कळण्याचे**
**जळतो मी, ढळसी तू आव्हानित मरणाला**
**अमराचा अळिता सखी अपुल्या पण चरणाला**

बोरकरांच्या कवितेला निळ्या रंगसंवेदन प्रतिमांचे विलक्षण आकर्षण आहे. या निळ्या संवेदनप्रतिमातून वैश्विक प्रीतीचा रंग गडद निळा होत जातो. 'नीळीये सारणीवाहे मोतियाचे पाणी.' रवींद्रनाथ म्हणतात,

Ages Pass, still thou pourest,
still there is room to fill.

बोरकरांच्या कवितेविषयीही असेच म्हणावे लागते. काळ जात आहे तरीही तुझा वर्षाव होतच राहणार. कारण अजून एक रिकामी खोली आहे. ती विशुद्ध सौंदर्यशास्त्रीय भूमिकेतून मापली जाईन तो दिवस बोरकरांच्या कवितेची जातकुळी शोधायला भाग्याचा ठरेल.

**टीप :** मांडवी १९७० बा. भ. बोरकर विशेषांकातून साभार.

☆☆☆

20/11/10

# बोरकर–कवितेतील 'रमलखुणा'

– सत्त्वशीला सामंत

२००३–०४ च्या सुमारास 'कवि बोरकर स्मृति समिति' तर्फे 'बोरकरांची समग्र कविता' हा प्रकल्प सिद्ध करण्याचा संकल्प सोडण्यात आला. 'देशमुख आणि कंपनी (पब्लिशर्स) प्रा. लि. पुणे' यांनी त्याचे प्रकाशन करण्याचे कबूल केले. कविवर्य बोरकरांच्या कन्या, सौ. पद्मा वज्रम् व त्यांचे जामात श्री. आप्पासाहेब वज्रम् यांचा माझा परिचय होताच, शिवाय बोरकरांच्या कवितेविषयीं मला ममत्वहि होतं. निखळ बोरकर–प्रेमापोटीं मी त्या संहितेच्या संपादनाची व मुद्रितशोधनाची जबाबदारी स्वीकारली. जानेवारी २००५ मध्ये पहिला खंड व मार्च २००८ मध्ये दुसरा खंड प्रकाशित झाला.

बोरकरांच्या सर्व कविता–संग्रहांतील एकूण एक कविता कालक्रमाने छापावयाच्या असल्याने, त्यांची निवड करण्याचा प्रश्नच नव्हता. पण मग संपादन म्हणजे नेमकं काय करणं अपेक्षित होतं? त्या संदर्भात असा विचार केला की, आपण भावी पिढीच्या अभ्यासकांना व रसिकांना सुगम होईल अशा स्वरूपात ती संहिता सिद्ध करावयाची. बोरकरांच्या पिढीतील बहुतेक कवी आपल्या कवितेखाली स्थल–कालाचा निर्देश करीत असत. त्या आधारे सर्व कविता मुळात कोणकोणत्या संग्रहात छापल्या गेल्या होत्या त्यांचे निर्देश करण्यात आले. दुसऱ्या खंडाच्या अखेरीस, सर्व कवितांच्या शीर्षकांची व पहिल्या ओळींची – अश्या दोन सूच्या (पृष्ठांकांसहित) जोडण्यात आल्या. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे बोरकरांच्या कवितांतील सर्व अपरिचित – विशेषतः कोकणी शब्दांचे अर्थ हुडकून कवितांखालील तळटिपांमध्ये ते अर्थ दिले. हा सर्व प्रयास व प्रवास खरोखरी आनंददायी होता. कित्येकदा अनेक जुने शब्दकोश चाळूनही काही शब्द हुलकावणी देत असत. अनेक व्यक्तींशी सल्लमसलत करूनही कधी कधी हाती काही लागत नसे बोरकरांच्या आवडत्या 'पारजा' प्रमाणे अर्थ हातून निसटून जात असे. आणि मग कधीकधी ध्यानीमनी नसताना, अचानक जवळपासच कोठेतरी तो अर्थ भेटत असे. अशा वेळी मला अवर्णनीय साक्षात्कार झाल्याचा भास होई आणि माझ्या आनंदाला पारावार राहत नसे. काही अर्थकोडी मात्र आजमितीस उलगडलेली नाहीत. त्यांच्या बाबतीत-

*"त्रिखंड हिंडुनि धुंडितसें*
*परि न हरपलें तें गवसे।।"*

अशी अजूनही माझी अवस्था आहे.

बोरकरांची सुप्रसिद्ध कविता म्हणजे 'तेथे कर माझे जुळती.' (खंड १, पृ. ८९–९०) ह्या कवितेतील उदात्त भावार्थाने कित्येक वर्षे जनमानसावर अधिराज्य केले आहे. त्या कवितेचे मुद्रितशोधन करीत असता अखेरच्या कडव्यापाशी आले –

*मध्यरात्रिं नभघुमटाखालीं*
*शांतिशिरीं तम चंवऱ्या ढाळी*
*त्यक्त, बहिष्कृत मी ज्या काळीं*
*एकांतीं डोळे भरती -*
*तेथें कर माझे जुळती*

'शांतिशिरी' ह्या शब्दावर थबकले. तेथे काही चूक असावी असे वाटले. 'शांति' व 'शिरी' हे दोन्ही शब्द जोडून छापले होते. अर्थात् 'शांतीच्या शिरी म्हणजे शांतीच्या मस्तकावर तम चंवऱ्या ढाळतो आहे' असा त्याचा अन्वयार्थ लावणे मला चुकीचे वाटत होते. म्हणून तो मुद्रणदोष असावा असे समजून, मी ते दोन शब्द तोडले आणि 'शांति शिरी' म्हणजे 'मस्तकात शांतता आहे व (मस्तकावर) तम (अंधकार) चंवऱ्या ढाळतो आहे' अशा अर्थाची दुरुस्ती केली. खंड १ चे प्रकाशन झाल्यावर काही योगायोगाने बोरकरांच्या षष्ट्यब्दिनिमित्त त्यांच्यावर डिसें. १९७० मध्ये काढण्यात आलेला 'मांडवी' चा विशेषांक हाती आला. तो चाळत असता, बोरकरांच्याच एका लेखावर नजर पडली – 'कविता फुलते अशी –.' त्या लेखात त्यांनी 'तेथे कर माझे जुळती' या कवितेची जन्मकथा दिली होती. (पृ. २१९) अधाशीपणाने मी तो

लेख वाचू लागले. १९३३ सालातील एका सायंकाळी दिवसभराची कामे आटपल्यावर, काळोख पडण्याच्या सुमारास बोरकर शिणवटा घालवण्यासाठी घराजवळच्या महालक्ष्मीच्या मंदिरापाशी गेले. देवीच्या गर्भागारातील नंदादीपांच्या झळाळत्या मालांकडे त्यांची नजर गेली आणि मग सहज ती आकाशाकडे वळली. वर तुरळक नक्षत्रे चमकू लागली होती. त्या क्षणिक आकाशदर्शनाने कवी एकदम मोहरून उठले आणि त्यांच्या तोंडून तालासुरांवर ओळी बाहेर पडू लागल्या –

*"तेथें कर माझे जुळती*
*दिव्यत्वाची जेथ प्रतीति ...."*

नंतर महाद्वारातून ते हमरस्त्यावर फेरफटका मारण्यासाठी बाहेर पडले. हिंडत असताना, वाटेत त्यांना जी जी दृश्ये दिसली त्यांच्या अनुषंगाने त्यांना त्या कवितेचे पुढील चरण सुचत गेले. अखेरीस ते जेव्हा थांबले तेव्हा आपला फेरफटका ही आज दिव्यत्वाची परिव्रजा ठरली आहे असे त्यांना वाटले. ते म्हणतात – "…. रात्र बरीच झाली होती. आकाशाचा घुमट असलेले हे विश्व हेच एक महामंदिर आहे. त्याच्या गर्भागारात शांतीची देवता आसनस्थ आहे. काळोख तिच्या मस्तकावरून चंवऱ्या ढाळीत आहे आणि अशा वेळी मी मात्र त्यक्त, बहिष्कृत आहे…. ." हे वाचताक्षणी माझ्या डोळ्यांसमोर मात्र अंधारी आली. कारण मी लावलेला अर्थ चुकला होता व कवीला 'शांतिशिरी' (म्हणजे 'शांतिदेवतेच्या मस्तकावर तम चंवऱ्या ढाळीत आहे') हेच अभिप्रेत होते हे मला कळून चुकले. पण बाण माझ्या हातून निसटला होता. कवितांचा खंड प्रकाशित झाला होता व आता मी त्यात बदल करू शकत नव्हते. (शेवटचा उपाय म्हणून आम्ही त्या छापील प्रतीत 'शांति शिरी' हे शब्द हाताने जोडून घेण्याचे ठरवले.) हा लेख माझ्या वाचनात अगोदर आला असता तर माझ्या हातून अशी चूक घडली नसती अशा विचाराने आताशा मन खंतावत आणि 'एकांती डोळे भरती' – अशी माझी स्थिती होते.

'जार–जारिणी' हे बोरकरांचे एक आवडते आध्यात्मिक रूपक आहे. लौकिक जगात वावरणाऱ्या व्यक्तीला जेव्हा पारलौकिकाची ओढ लागते तेव्हा ती लौकिक संसाराशी बेईमान होऊन त्याच्याशी प्रतारणा करते. राधा आणि मीरा ह्या तर सर्व संतकवींना आणि बोरकरांसारख्या आधुनिक कवींनाही मोहवणाऱ्या नायिका. 'ये पुढल्या दाराने' (खंड १ : २११) 'आज तुझ्या घरि आल्ये' (खंड १ : ३७१) आणि 'मज सजविं बाइये' (खंड २ : १८५) अशा काही कवितांतून बोरकरांनी पारलौकिक परपुरुषाशी रत होणाऱ्या नायिकांचे रमणीय चित्रण केले आहे.

'हरिच्या स्मरभुवनी' (खंड १ : २५१–२५२) ह्या कवितेतली नायिका तर लग्नघटिका जवळ आली असता, सखीचा हात धरून बोहल्यावरून पळून जाण्याच्या विचारात आहे. ती सखीला म्हणते –

*वराया तनु येवो नवरा*
*........................*
*येथले पाश अतां तुटले*
*देहसुखा जें भुलले जग, त्या मन माझे विटले*
*भुले जो केवळ देहसुखा*
*स्पर्शे का तो शकेल उजळू हृदयांतिल अलका?*
*असा तुज काय रुचेल सखा?*
*जीव हिरावुनि गेला त्याला म्हणशिल का परका?*

याही कवितेत मला प्रथम 'अलका' हा शब्द अडला होता. परंतु मी माझ्या परीने त्याचा शोध घेऊन अर्थ लावला आणि तो अर्थ (परमेश्वराला) मी तळटीपेत दिला. मी दिलेल्या अर्थाबद्दल अन्य कोणाचा मतभेद होऊ शकेल अशी पुसटशी शंकाही माझ्या मनात आली नाही. पण इतर काही शंकांचं निरसन करून घेण्यासाठी मी व वज्रम् पती–पत्नी एका चिकित्सक व जाणकार तज्ज्ञांकडे गेलो असताना, ती तळटीप त्यांच्या नजरेस पडली आणि ते एकदम उद्गारले – "अहो, हा अर्थ चुकलाय्!" मी तर भांबावूनच गेले. मग मी त्यांच्या मते बरोबर अर्थ काय असं त्यांना विचारलं. तेव्हा त्यांच्या मते 'अलका' म्हणजे 'अलकापुरी वा अलकानगरी' असा अर्थ आहे असं ते म्हणाले. मला तो अर्थ पटला नाही, म्हणून त्यांच्याबरोबर थोडा वाद घातला, पण अखेरीस त्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध व्यक्तीपुढे मला जरा नमतं घ्यावे लागलं. त्यानंतर मी आणखी दोन नामवंतांशी चर्चा केली, पण त्यांचंहि मत तसंच पडलं आणि मी अल्पमतात गेले. तरीही माझं मन स्वस्थ नव्हतं. मी

लावलेलाच अर्थ बरोबर आहे अस माझ अंतर्मन सांगत होत. सरतेशेवटी पुस्तकातील तळटीपेत मी मला पटलेला आणि इतरांनी लावलेला – असे दोन्ही अर्थ दिले.

कवितेतल्या संबंधित ओळी अश्या –

*भुले जो केवळ देहसुखा*

*स्पर्शे का तो शकेल उजळूं हृदयांतिल अलका?*

ह्या ओळींचा संदर्भ पाहता प्रत्येकाच्या हृदयात अस 'काहीतरी' मूलतः असतंच, पण काही कारणाने त्यावर काजळी धरते व ती दूर सारली की ते 'काहीतरी' उजळून निघतं असा स्पष्ट वाच्यार्थ दिसतो. मग हे 'काहीतरी' म्हणजे काय? त्या नामवंतांच्या म्हणण्यानुसार, ती 'अलकापुरी वा अलकानगरी' होय अस वादापुरतं मान्य केलं तरी, प्रत्येकाच्या हृदयात 'अलकानगरी' वसत असते आणि कधी कधी ती काळवंडते व मग तिला उजाळा द्यावा लागतो. असा कोठेही संकेत नाही. उलट, कुबेराची अलकानगरी म्हणजे लौकिक ऐश्वर्याचं आणि देहसुखाचं आगार होय आणि बोरकरांच्या कवितेतली नायिका नेमकी त्याच बाह्यवैभवाला नकार देत आहे. 'देहसुखा जे भुलले जग, त्या मन माझे विटले' असं ती म्हणते. म्हणून मी 'अलकानगरी' हा अर्थ मनोमन नाकारला. मग माझ्या मते 'अलका' या शब्दाचा खरा आणि नेमका अर्थ काय होता?

प्रत्येकाच्या अंतःकरणात परमेश्वर वसत असतो, अविद्या, माया, इ. भ्रमांमुळे तो परमेश्वर कित्येकदा मलिन होतो, काळवंडतो; मात्र साधुसंतांच्या संगाने, ते मालिन्य दूर होते व तो परमेश्वर उजळून निघतो, त्या 'हृदयस्थ परमेश्वरा'ला जाग येते असा एक संकेत भारतीय तत्त्वज्ञानात रूढ आहे. बा. भ. बोरकर हे नाथपंथी संत सोहिरोबांचे भक्त होते. (त्यांनी एके काळी सोहिरोबांचे चरित्रहि लिहिले होते) व नाथपंथात 'अलख निरंजन' (परमेश्वर) ही संकल्पना प्रचलित आहे. 'अलख' हा मूळ 'अलक्ष्य' शब्दाचा अपभ्रंश आहे. 'अलक्ष्य' वा 'अलख' याचा अर्थ 'परमेश्वर वा ब्रह्म' होय. पण मग बोरकरांनी 'अलका' असा शब्द का वापरला असेल याचा मागोवा घेण्यासाठी मी 'महाराष्ट्र शब्दकोश' उघडला. तेथे मला 'अलख' शब्दांपुढे 'अल्लक; ब्रह्म; त्यावरून ईश्वर' असे अर्थ सापडले. 'अल्लक' याचे द्वितीया विभक्तिरूप 'अलकाला' असे होणार. (कारण ज्या मूळ शब्दांत एखाद्या वर्णाचे द्वित्व असते त्यांच्या विभक्तिरूपांत ते निघून जाते; उदा. रक्कम–रकमेला, चप्पल–चपलेला, दुक्कल–दुकलीने, मुद्दल–मुदलात इ.) तसेच, जुन्या काव्यात द्वितीयेचा प्रत्यय लोप पावण्याची प्रवृत्ती दिसते. म्हणून 'अलकाला' (ईश्वराला) याचे 'अलका (ला)' असे संक्षिप्त रूप झाले. पण तरीही बहुशः 'अलख' हा शब्दप्रयोग रूढ असताना, बोरकरांनी क्वचित् वापरला जाणारा 'अलक' हा शब्द का योजला असावा? त्याचं उत्तर मला पुढील चरणात मिळालं. तेथे 'परका' हा शब्द आला असून त्याच्याशी यमक साधण्याच्या उद्देशाने बोरकरांनी 'अलका (ला)' हा शब्द वापरलेला दिसतो.

त्याचबरोबर, मूळचा 'ख'कारी शब्द मराठीत 'क'कारी होण्याची प्रवृत्ती आहे काय याचाही मी शोध घेतला. तेव्हा मला पुढील शब्द सापडले. उदा. –

भक्ष्य (सं.) – भख – भक (ग्रामदेवता, इ. स दिलेले अन्न, भक्ष्य, बळी – महा. शब्दकोश – दाते)

साक्ष्य (सं.) – साक्ष – साख – साक (पुरावा, पत)

शिक्षा (सं.) – शिख – शिक/शीक (वण)

भिक्षा (सं.) – भीख (हिं.) – भीक

बुभुक्षा (सं.) – भूख (हिं.) – भूक

दोख (हिं.) – ढोक (पक्षी)

धोखा (हिं.) – धोकाः झरोखा (हिं) – झरोका

शुष्क (सं.) – सूखा (हिं.) – सुका

भाषा (सं.) – भाखा/भाख – भाक (त्वचन– 'आणभाक')

हा शोध चालू असताना, अकस्मात् मराठीचे निरुक्तकार व इतिहासाचार्य वि. का. राजवाडे माझ्या साह्याला धावून आले. 'साहित्य अकादेमी'ने प्रकाशित केलेल्या 'राजवाडे लेखसंग्रहा'त 'प्राकृतिक भाषांचा व वाङ्मयाचा इतिहास' असा त्यांचा एक लेख असून, त्यात त्यांनी 'भीक' या शब्दाचा दुसरा चेहरा दाखवला आहे –

भीषा (सं.) (भय) – भीख – भीक (त्यावरूनच 'भिकूड – भेकड') अशी त्यांनी आणखी एक व्युत्पत्ती सांगितली आहे. 'मी धमक्यांना भीक घालीत नाही.' अशांसारख्या वाक्यांत 'मी धमक्यांना भीत नाही', असा

भावार्थ आहे. सुप्रसिद्ध लेखक प्रा. शंकर सखाराम ह्यांनी आपल्या 'बलुतेदार' या पुस्तकात आगरी, कातकरी, इ. बोलींची जी वैशिष्ट्ये नमूद केली आहेत त्यामध्येही 'ख' चा 'क' होण्याकडे कल दिसतो. उदा. –

सुखो – सुको (गणपती गजानना सुकी ठेव रे बाप्पा)

सखा – सका

खटारा – कटारा; इ. "या नियमानुसार आमच्या बोलीत 'अलख'चा 'अलक'च होणार" 'असंहि'ते मला समक्ष भेटीत म्हणाले.

थोडक्यात, माझ्या मते 'अलका (ला)' म्हणजे 'परमेश्वराला' असा अर्थ संभवतो –

*"भुले जो केवळ देहसुखा*
*स्पर्शे का तो शकेल उजळूं हृदयांतिल अलका?"*

(जो निव्वळ देहसुखाला भुलतो तो अंतरंगातील वा हृदयातील सुप्त परमेश्वराला उजाळू शकेल का?) पण तरीही अजून माझं पुरतं समाधान झालेल नाही. कारण 'अल्लक' हा शब्दप्रयोग मराठी वाङ्मयात कुठे झाला आहे याचा उल्लेख महा. शब्दकोशा'त नाही. माझा तर्क असा की, संत सोहिरोबांच्या वाङ्मयात कुठेतरी हा शब्द वापरला गेला असावा. त्याचाही शोध घेण्याचा मी जंगजंग प्रयत्न केला. पण अजून यश आलं नाही. माझ्या मताच्या पुष्ट्यर्थ मला कुठे असा उल्लेख सापडला तर, माझ्या मताला अधिकच बळकटी येईल. मी अजूनही पोषक पुराव्याच्या शोधात आहे.

बोरकरांच्या 'बारा मास एका क्षणी' (खंड १ : ३८२) या कवितेने असेच मला गुंगविले. प्रेयसीच्या रूपाच्या विविध मनोहारी आविष्कारांतून कवीला बाराही मासांच्या सौंदर्याचा साक्षात्कार होतो अशी त्यातली मध्यवर्ती कल्पना असून, प्रत्येक कडव्यात त्याने एकेका महिन्याचे वर्णन केले आहे. चौथ्या कडव्यात कवी म्हणतो –

*तुझ्या शब्दी आश्विनाच्या आकाशाचे चमत्कार*
*हावभाव लकारांत करी कार्तिक शृंगार।*

या ठिकाणी 'लकार' म्हणजे नेमका अर्थ काय असा प्रश्न उपस्थित झाला. 'लकार' याचा कोशगत अर्थ 'लबाड, लुच्चा, लफंगा, इ.' असा असून तो अर्थ इथे अप्रस्तुत आहे. 'लावण्य, ललाम (शोभा), लालित्य, लवलव' इ. सौंदर्यगुण तर नव्हेत ना अशी शंका मनाला चाटून गेली. पण तस ठासून सांगण्या इतपत आधार मिळाला नाही. म्हणून अखेरीस तो मुद्रणदोष असून तेथे 'लकेर' असा शब्द असावा असे मानून अर्थ दिला. 'लकेर' म्हणजे 'गाण्याची लकेर' या सुप्रसिद्ध अर्थाव्यतिरिक्त त्याला 'तेज, चकाकी, माधुर्य, मोहकता, मनोरम सौंदर्य' असेही अर्थ असल्याचे आढळले. अचानक मला दुर्गाबाई भागवतांच्या 'ऋतुचक्र'मधील 'संध्यारंजित कार्तिक' आठवला –

"..... संध्याकाळी ..... सूर्य बुडू लागला की ही अभ्रखंडे एकदम सोनेरी होतात. किती सोनेरी आणि तेजस्वी म्हणून सांगू! मावळत्या सूर्याचा लाल गोळा झगमगीत सोन्याच्या ढिगात ठेवल्यासारखे वाटते....."

इथे मला कार्तिकमास आणि सोनेरी चकाकी या दोहोंमधील 'तेजस्वी' दुवा सापडला. कवी हयात नसल्याने 'स्थितस्य गतिश्चिन्तनीया' या न्यायाने कशीबशी अर्थनिष्पत्ती केली. मनाचं पुरतं समाधान मात्र झालं नाही.

जुलै १९८४ मध्ये कविवर्य बोरकर निधन पावले. तत्पूर्वी एप्रिल महिन्यात त्यांच्या डोळ्यांना मोतीबिंदूची व्याधी झाल्याने त्यांना रुग्णालयात भरती केले होते. मधुमेहाचा आजार असल्याने डोळ्यांवरील शस्त्रक्रिया अवघड होती, शिवाय शस्त्रक्रिया झाली तरी ती यशस्वी होईलच याची खात्री नव्हती. त्यामुळे दृष्टि परत आली नाही तर, आपल भवितव्य अंधकारमय राहणार या चिंतेने त्यांना घेरलं होतं आणि त्यांचं मन निराशेने ग्रासल होतं. अश्या अवस्थेत त्यांच्या तत्त्वचिंतक मनाने या 'तमा'शीच जवळीक करण्याचं ठरवलं आणि रुग्णशय्येवर असतानाच त्यांना 'तमःस्तोत्र' स्फुरल. (खंड १ : ४८१) 'रात्रीच्या गर्भात असे उद्याचा उषःकाल' अस कुसुमाग्रज म्हणतात त्याप्रमाणे बोरकर भगवान् तमाला उद्देशून 'प्रकाशजनका पुरुषोत्तमा' अस संबोधतात. संपूर्ण कवितेवर उपनिषदांच्या तत्त्वज्ञानाची छाप आहे. याच कवितेतील एक चरण असा –

ऐसा तू गा दातारू
निजानंदाचे आवारू
मृत्यू होऊनि माझा भारू
सारोद्धारू वाहिलासी –

‘सारोद्धारू’ या शब्दानं मला छळ छळ छळलं. अनेक संस्कृत, मराठी शब्दकोशांतून धांडोळा घेतला, कविवर्य पाडगावकरांपासून अनेकांशी चर्चा केली, पण हाती काही गवसलं नाही. ‘महाराष्ट्र शब्दकोश’ पाहताना मी ‘सार’ या शब्दाखालच्या नोंदी तपासल्या. पण व्यर्थ! हताश अवस्थेत असताना एक दिवस अचानक पुन्हा ‘महाराष्ट्र शब्दकोश’ उघडला आणि ‘सारोद्धारू’ असा अखंड शब्द मिळतो का पाहू लागले, आणि काय आश्चर्य! तिथे ‘सारोदार, सारोद्धार’ असे जोडशब्द दिसले. त्यापुढे “(कु. गो.) सदासर्वदा, सतत” असे अर्थ सापडले. (‘यूरेका, यूरेका’ म्हणून नाचायचंच तेवढं बाकी होतं.) म्हणजे कुडाळी व गोमंतकी बोलीतला हा साधासुधा शब्द होता. पण कविता गंभीर स्वरूपाची असल्याने ‘सारोद्धार’ हा एखादा भारदस्त संस्कृत शब्द असावा असा माझा ग्रह झाला. त्यामुळे शोधाची दिशा चुकली आणि ‘काखेला कळसा नि गावाला वळसा’ अशी गत झाली. ‘सारोद्धारू’ने मला असा चकवा दिला.

‘जपानी रमलाची रात्र’ (खंड १ : पृ. २२१) ही बोरकरांची अशी एक मायावी कविता आहे की, तिने अगणित रसिकांना भारून तर टाकलंच, पण कित्येक समीक्षकांपुढे आव्हानही उभं केलं. कित्येकांना ही ‘रमला’ कोण असा प्रश्न पडला होता म्हणे! (बहुतेकांना ही ‘रमला’ म्हणजे त्या कवितेतील जपानी रमणीच होय असं वाटलं होत.) शब्दार्थ देताना मलाही तसाच प्रश्न पडला होता. म्हणून मी ‘रमला’ या शब्दाला संस्कृतमध्ये ‘रमणी’ वजा काही अर्थ आहे काय याचा शोध घेतला, पण काही बोध झाला नाही. अकस्मात् माझ्या मनाला एक शंका चाटून गेली. ‘रमला’ हा स्त्रीलिंगी शब्द इथे अभिप्रेत असेल तर, मग कवीने त्या शब्दाच ‘रमलेची’ अस सामान्यरूप का केलं नाही? त्याने असं केलं नाही त्याअर्थी मूळ शब्द ‘रमल’ असा अकारान्त तर नसेल ना? मग या दिशेने माझी विचारशृंखला आणि शोधयात्रा चालू झाली. कै. य. रा. दाते यांचा ‘महाराष्ट्र शब्दकोश’ आणि मोल्सवर्थचा शब्दकोश धुंडाळला. ‘रमल’ हा मूळचा अरबी शब्द असून ती एक गूढ विद्या आहे. ‘रम्ल’ म्हणजे रेती किंवा वाळू. रेतीवर किंवा कागदावर काढलेल्या रेघांवरून अथवा फांश्यांवरून शकुन पाहण्याची विद्या म्हणजे रमलविद्या (geomancy). हिब्रू परंपरेतील गॅब्रीअल् या देवदूताने डॅनियल् या प्रेषिताला ही विद्या शिकवली. यावरून ‘रमल’ याला हळूहळू ‘गूढ’ असा लाक्षणिक अर्थ प्राप्त झाला. या चक्रावून टाकणाऱ्या गूढतेमुळे मनावर एक प्रकारचं गारुड होतं. बोरकरांच्या कवितेतल्या जपानी गैशेने – रमणीने – कवीच्या मनावर असच गारुड केलेलं दिसत. म्हणून ही ‘रमलाची रात्र.’ योगायोगाने ‘रमल’ या शब्दाच संस्कृत ‘रमण’ या शब्दाशींही सादृश्य आहेच आणि ‘रमण’ याला ‘मोहक, मदन, विषय-विलास, कामक्रीडा, मैथुन, आनंद’ अशा अनेक अर्थांचे पैलू आहेत. म्हणून ‘रमल’ म्हणजे गूढरम्य सौंदर्य असा मी अन्वयार्थ लावला.

बोरकरांना ही कविता कशी सुचली, प्रत्यक्षात त्यांना अशी सुंदरी भेटली होती का आणि ती जपानीच होती का याबद्दलही अनेकांना गूढ वाटत होत. “अशी रात्र तुम्ही खरोखरच जगला होता काय?” अस एकदा एका रसिक विदुषीने त्यांना विचारल. कवीने मोघम स्मित करून तिच्या प्रश्नाची बोळवण केली. अनुभव प्रतिभेतला असो किंवा प्रत्यक्षातला असो – रसिकाकडून अशी पावती मिळणे हीच कलेची सार्थकता अशी कवीची भावना होती. ‘मांडवी’तील त्याच लेखात बोरकरांनी या कवितेची कूळकथा निवेदन केली आहे.

१९४३ सालच्या ऑक्टोबर महिन्याच्या २७ तारखेला मुरगाव बंदरात अमेरिकन आणि जपानी युद्धकैद्यांची अदलाबदल होणार होती. ती पाहायला बोरकरांचे दोन मित्र जाणार होते. ते बोरकरांकडे येऊन त्यांना आपल्या-बरोबर येण्याचा आग्रह करू लागले. त्या सर्वांना बोटीवरील जपानी गैशा युवतींना पाहण्याचे औत्सुक्य होते. परंतु काही अडचणीमुळे बोरकरांना तेथे जाता आले नाही. तथापि, त्या काळात जपानी युवतींची चित्रे असलेल्या कॅलेंडरांची गोव्यात एक लाटच आली होती. त्या कॅलेंडरां-वरील जपानी रूपयौवनांची सुकुमारता व उत्तेजकता यांची खुद्द बोरकरांवरही एक प्रकारची मोहिनी पडलेली होती. त्यामुळे यावेळी अश्या युवतींना प्रत्यक्षात पाहण्याची संधी हुकली म्हणून बोरकरांना हुरहूर लागून राहिली. त्या हुरहूरीतूनच ‘जपानी रमलाची रात्र’ ही कविता जन्माला आली. ती कविता आकाराला येत असताना कवीच्या

सर्व ऐंद्रिय संवेदना इतक्या तीव्र झाल्या की, 'प्रत्यक्षाहुनि प्रतिमा उत्कट' अशी त्यांना प्रतीति आली आणि रसिकांच्या मनांतही ती प्रतिबिंबित झाली.

पुढे अनेक वर्षांनी - १९७० सालच्या सुमारास कविवर्यांच्या चिरंजीवांनी त्यांना एक जपानी बाहुली भेट म्हणून पाठवली. ती त्यांनी आपल्या मेजावर ठेवली होती. बोरकर लिखाण करून शिणले आणि खुर्चीत विसावले की त्यांना ती नजरेसमोर दिसे. मग तिच्याशी त्यांचा संवाद सुरू होई. त्यानंतर पुन्हा त्यांचा जीव ताजातवाना होऊन ते कामाला लागत. 'जपानी पोरगी' (खंड २ : १९९-२००) या कवितेत बोरकर म्हणतात -

*"मनात येते :*
*आपला पुढचा जन्म*
*जपानमध्ये तर नसेल?"*

बोरकरांच आणि जपानी सुंदरीच अस काय जन्मां-तरीच नात होत हे वाचकाला न उकलणार एक कोडच आहे!

'बोरकरांची समग्र कविता' (खंड १ व २) यांच संहिता-संपादन करीत असताना, अश्या अनेक 'रमल-खुणा' मला भेटल्या. त्या त्या वेळी मी वाच्यार्थ निश्चित करण्यापुरताच त्यांचा मागोवा घेतला आणि त्यांतील कूटसौंदर्य अनुभवल. अजूनही अश्या कित्येक 'खुणा' मला खुणावताहेत की ज्यांचे वाच्यार्थापलीकडील गूढार्थ-देखील मला मोहवत आहेत. बोरकर-कवितेतील त्या गूढार्थांचाही कधीतरी मला वेध घ्यायचा आहे. ती मात्र खऱ्या अर्थाने माझी 'आनंदयात्रा' ठरेल!

**टीप :–** हा लेख 'युगवाणी' या त्रैमासिकाच्या जानेवारी ते मार्च २००८ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे.

☆☆☆

---

# लॅटिन संस्कृतीच्या घरोब्यातील गोमंतकीय कवी

– प्रा. रवीन्द्र घवी

अर्वाचीन मराठी काव्याचा मागोवा घेत निघाल्यास केशवसुत–तांबे आणि त्यांचे समकालीन, बालकवी–गोविंदाग्रज आणि समकालीन, रविकिरणमंडळ व समकालीन यांचा विचार करीत आपण बोरकर–कुसुमाग्रज आणि समकालीन यांच्या कवितेकडे ओघानेच येतो. हा मराठीतील स्वच्छंदवादी कवितेचा अखंड प्रवाह आहे. स्वच्छंदवादाला (Romanticism) त्याकाळी 'सौंदर्यवाद', 'अद्‌भुतरम्यतावाद', 'रोमांचवाद' अशा संज्ञा अधिक प्रचलित असलेल्या दिसतात. अलीकडे 'स्वप्नशीलता' अशीही अर्थवाही संज्ञा वापरलेली आढळते.[१]

स्वच्छंदवाद ही एकोणिसाव्या शतकात युरोपात नावारूपास आलेली वाङ्‌मयीन प्रवृत्ती. अभिजातवादाविरुद्ध झालेल्या जोमदार प्रतिक्रियेतून तिची चळवळ उभी राहिली. पुढे देशोदेशींच्या वाङ्‌मयीन परंपरांशी झगडत, भिन्नभिन्न छटा धारण करीत ती सार्वत्रिक झाली. पुढे तिला इतकी भिन्नता आली की तिची नेमकी वैशिष्ट्य सांगण मुष्कील होऊन बसल. आपल्या आध्यात्मिक प्रवृत्तींशी मेळ घालीत केशवसुतांनी जो स्वच्छंदवाद इथे प्रवर्तित केला तोही असाच कोकणच्या कलमी आंब्यासारखा आहे. इंग्रजीतील 'गोल्डन ट्रेझरी'तील कवितांचा त्यावरील प्रभाव उघड आहे. 'सौंदर्याच्या सान्निध्यातील थरथरती संवेदनक्षमता' हे त्याचे मुख्य लक्षण होते. स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचा मुक्त आविष्कार हे या वादाच प्राणतत्त्व दिसत. शिवाय कविंपरत्वे भिन्नभिन्न विशेष सांगावे लागतात.

या लेखात कवी बा. भ. बोरकरांच्या स्वच्छंदवादाचे काही वेगळे विशेष नोंदवावेसे वाटतात.

बा. भ. बोरकरांनी स्वतः म्हटले आहे की, "कविवर्य तांब्यांच्या घराण्याची गायकी पुढे चालविण्याच्या निष्ठेने मी कलेच्या उपासनेला लागलो......मला त्यांच्यात माझा समानधर्म भेटला." यावर भाष्य करताना डॉ. कल्याण काळे यांनी म्हटले आहे की, " बोरकरांचे तांबे संप्रदायाचे अनुयायित्व कवितेच्या बाह्य घाटापुरते मर्यादित होते. बोरकरांच्या कवितेला आशयसंपन्न करणाऱ्या चिंतनाचा केंद्रबिंदू महाराष्ट्राबाहेर होता. तो म्हणजे गुरुदेव रवीन्द्रनाथ टागोर."

स्वतः बा. भ. बोरकर, आणि तांबे व टागोर हे तीनही कवी तत्कालीन महाराष्ट्राबाहेरचे होते ही गोष्ट लक्षणीय वाटते. तांबे आणि रवीन्द्रनाथ हे स्वच्छंदवादी, श्रद्धाशील, आशावादी आणि आनंदयात्री कवी. बोरकरांच्या कविप्रवृत्तींशी जुळणारे. ते बोरकरांना समानधर्मी वाटणे आणि त्यांचा प्रभाव पडणे ही गोष्ट साहजिक वाटते. पण एवढ्यानेच बोरकरांच्या स्वच्छंदवादी कवितेचे सारे मर्म उलगडत नाही. निसर्गरम्य गोमंतकाचा भूप्रदेश आणि पोर्तुगीजकालीन गोमंतकीय समाजजीवन यांचा बोरकरांवरील प्रभाव हे त्यांच्या कवितेचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य दिसते.

बोरकरांचा गोव्यात जन्म झाला (१९१०). त्याच साली पोर्तुगालात क्रांती होऊन 'रिपब्लिक' अवतरले ते जेमतेम १६ वर्षेच टिकले पण त्याचा फायदा गोव्यातील हिंदू प्रजेने पुरेपूर उठविला. त्यांना जे धार्मिकस्वातंत्र्य मिळाले व लेखनस्वातंत्र्य मिळाले. त्यामुळे इथे एक सामाजिक पुनरुत्थान घडून गेले. याबाबत 'भारत'कार हेगडे–देसाई यांनी म्हटले आहे की, "जी कार्ये चारशे वर्षांत ख्रिस्तीधर्म करू शकला नाही तीच कार्ये करण्यास दडपणातून मुक्त झालेले हिंदुत्व दहा वर्षांच्या आत सिद्ध झाले हेच काय ते आमच्या धर्माचे रहस्य." अंतरी भाविक राहून परिवर्तनशील बनलेल्या अशा समाजाच्या

अनुक्रमणिका

संस्कारांत घडलेल बा. भ. बोरकरांच व्यक्तिमत्त्व होत.

त्यांच्या काळातही पोर्तुगीजांसह आलेल्या लॅटिन संस्कृतीचा आणि ख्रिश्चन समाजाचा पगडा गोमंतकावर होताच पण 'इन्क्विझिशर्न'चा-धर्मसमीक्षेचा जाच राहि-लेला नव्हता. शिवाय महाराष्ट्रावर राज्य करणारे ब्रिटिश 'ॲथॉरेटरीयन' होते. तर 'रिपब्लिक'पासून तरी पोर्तुगीजांचे धोरण 'ॲसिमिलेशन'चे होते. इतिहासाच्या ओघात तत्का-लीन गोमंतकात पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृतींचा संघर्ष आणि समन्वय घडत होता. हिंदू आणि लॅटिन संस्कृतीचा पगडा असलेला युरोपीयन ख्रिश्चन वा धर्मां-तरीत ख्रिश्चन यांचा शेजार होता. पोर्तुगीजांनी राज्यभाषा म्हणून पोर्तुगीज रूढ केली होती. पोर्तुगीज अभ्यासक्रमात ('लायसिएम्' किंवा 'लिसेंव') 'कॉंटिनेंटल पॅटर्न' होता. शिक्षण भाषाप्रधान होते. ग्रीक, लॅटिन या अभिजात भाषा व पोर्तुगीज, फ्रेंच इटालियन इ. आधुनिक युरोपीय भाषा अभ्यासक्रमात होत्या. शिक्षणाचे माध्यम पोर्तुगीजच होते.

या सगळ्याचा परिणाम म्हणून घरोघरी मराठी भाषा भक्तिभावान जोपासून आपल स्वत्व सांभाळण्याची धडपड हिंदू समाज कटाक्षान करीत होता. संस्कृत भाषा ही तर देववाणीच. तिचही पठण चालू होत. भजन, कीर्तन यांची रेलचेल असे. अभंग, ओव्या, आर्या, आरत्या, स्तोत्र यांनी गोव्यात अष्टौप्रहर कविता नांदत होती. दशावतारी खेळ आणि पौराणिक नाटके हे देवस्थानांतील विधीच झाले होते. गोव्यातील अभिजनांवर व बहुजन समाजावर वारकरी पंथाचा प्रभाव खोलवर पडलेला होता. (तो आजही आहे. वार्षिक भजनस्पर्धा घेणार देशातलं एकमेव सरकार गोव्यात आहे.) हा प्रभाव किती खोलवर रुजलेला आहे ते कवी बोरकर यांनीच एका ठिकाणी नमूद केले आहे. बोरकर म्हणतात, "मला हल्लीच एक जुने जानपर गीत सापडले. 'धालां'त ते म्हटले जाते. आमच्याकडे जी विशिष्ट प्रकारची राजगिऱ्याची भाजी उगवते तिला 'तांबडी भाजी' म्हणतात. ती खुडण्या-पासून तिच्या चुड्या बांधून ती टोपलीत घालीपर्यंतच्या क्रिया या गीतात वर्णिल्या आहेत. आणि शेवटी म्हटले आहे की, रखमाईला या भाजीचे डोहाळे लागले आहेत. म्हणून आम्ही ती घेऊन पंढरीला चाललो आहोत. विठ्ठल-भक्ती गोव्यातल्या खेडूत स्त्रियांपर्यंत केवढ्या जिव्हाळ्याने पोचली आहे त्याचा हा बोलका पुरावा."

वरील परिस्थितीमुळे गोमंतक आणि महाराष्ट्र या लगतच्या प्रदेशांतील माणसांची संवेदनशीलता अंशतः वेगळी बनत गेली. गोमंतक मराठी साहित्य संमेलनाच्या पहिल्याच अधिवेशनात स्वागताध्यक्ष शांबाराव सरदेसाई यांनी या दोन प्रदेशांची वाङ्मयीन दृष्ट्या तुलना करताना म्हटले आहे की, "गोमंतक आणि इतर महाराष्ट्र यांच्या मानसिक प्रकृतींत मूलतःच अंतर आहे. गोमंतकीय व महाराष्ट्रीय हे दोघेही बुद्धिमान असले तरी महाराष्ट्रीय हा जात्याच कणखर, उद्योगी, हिशेबी व उपयुक्ततावादी असतो. तर गोमंतकीय हा कोमल प्रकृतीचा, सुखासीन संवेदनाशील व सौंदर्यवादी असतो. यामुळे महाराष्ट्रीयाची दृष्टी बरीचशी जडवादी तर गोमंतकीय याची तरल व्हावी यांत नवल नाही. ......ती तशी असावयास अनुवंशिकतेचे संस्कार बरेचसे कारणीभूत झालेले आहेत. भौगोलिक परिस्थिती हेही एक कारणांच्या बाबतीत प्रभावी आहे. महाराष्ट्रात निसर्गाने गांभीर्य धारण केलेले आहे. तर गोमंतकात तो लीलेने हसत आहे. तिकडे नागर जीवनाचा फायदा घेण्यासाठी निसर्गाकडे पाठ फिरविली जात आहे. तर इकडे निसर्गसहवासांतील ग्रामीण जीवन शहरी सुखसोयींचे स्वागत करीत आहे. तिकडे पाश्चात्त्य संस्कृतीचा संबंध मूठभर सुशिक्षितांच्या विचारांशीच आला आहे. तर इकडे ते घरोब्याचेच आहे. इथे हिंदू व ख्रिश्चन यांची धर्माने जरी ताटातूट केलेली असली तरी निसर्गाच्या खुल्या वातावरणात ते परस्परांशी सहज समरस होऊ शकतात. तुलनात्मक दृष्ट्या पौरस्त्य व पाश्चात्त्य या उभय संस्कृतीतील गुणावगुण मार्मिकतेने पारखण्याची

शक्यता इकडे अधिक प्रमाणात आहे. शिवाय लक्षात घेण्याजोगी आणखी एक गोष्ट अशी की, गोमंतकात व महाराष्ट्रात ज्या परकीय संस्कृतींचा शिरकाव झाला आहे त्या उभयतांना आपण पाश्चात्त्य संस्कृती या एकाच नावाने संबोधित असलो तरी त्या बऱ्याचशा भिन्न आहेत. गोमंतकाच्या राज्यकर्त्यांची संस्कृती लॅटिन तर महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांची अँग्लोसॅक्सन आहे. आणि योगायोग असा की त्या त्या ठिकाणच्या मूळच्या संस्कृतींशी त्या काहीशा मिळत्या जुळत्या आहेत." (१९३५)

महाराष्ट्रापेक्षा वेगळ्या प्रदेशात कवी बोरकर यांची जडणघडण झाली आहे. 'Goan Personality' असा एक सुंदर लेख त्यांनीच लिहिला आहे. त्यात त्यांनी सांगितलेल्या गोमंतकीयांच्या साऱ्या गुणवैशिष्ट्यांचा समुच्चय त्यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेला दिसतो. आणि ती सारी वैशिष्ट्ये त्यांच्या स्वच्छंदी कवितेतून ओसंडून जाताना दिसतात. तत्कालीन गोव्यातील घरोघरी घडणाऱ्या संस्कारांतून त्यांच्या वृत्ती आध्यात्मिक व सश्रद्ध बनल्या तरी सभोवारच्या समाजातून ज्या नवीन प्रवृत्ती त्यांना दिसल्या त्या त्यांनी शोषून घेतल्या. यादृष्टीने त्यांच्या घराबाहेरील दोन प्रेरणास्त्रोत नोंदवितो. तत्कालीन नॉर्मल स्कूलच्या (शिक्षक प्रशिक्षण संस्था) प्रमुख दोना प्रार्पेसिया कुरैय्य आफोन्स प्रित्ररेदो या थोर विदुषींचे त्यांच्यावर पुत्रवत प्रेम होते. त्या मूळच्या बाणावलीच्या होत्या. ख्रिश्चन होऊनही त्यांना भारतीय गोष्टींचे प्रेम होते. त्यांनी ३५० पत्रे बोरकरांना धाडली होती. त्या पत्रांबद्दल बोरकर म्हणतात, "ज्या सीमा घेऊन आपण जन्माला येतो त्या ओलांडून मी आज विश्वनागरिक होऊ शकलो तो त्यांच्या पत्रांमुळे." "ग्रीकांची सौंदर्यदृष्टी आणि भारतीय आध्यात्मि-कता यांच्या युतीची जगाला गरज आहे." ही गोष्ट त्या बाई बोरकरांच्या मनावर बिंबवित होत्या.

पाश्चात्त्य सौंदर्यदृष्टी आणि भारतीय सभ्यता या अनोख्या युतीच मूर्तिमंत दर्शन प्रो. रामचंद्र शंकर तथा राणू नायक यांच्या संपन्न रसिक व्यक्तिमत्त्वात बोरकरांना घडत होत. त्यांच्याबद्दल बोरकर म्हणतात, "त्यांचे रुचिर व्यक्तिमत्त्व गोमंतकीय आणि पोर्तुगीज या उभय संस्कृतींच्या संगमातून उगवले होते." बोरकर या संगमतीर्थी सुस्नात झालेले दिसतात. या राणू नायकांनीच बोरकरांच्या सुटाच्या रंगाला 'मॅच' होणारा 'टाय' घेऊन दिला. तो बांधायला शिकवला. आणि बुटांना पॉलिश करण्याचे पाश्चात्त्य रिवाज पटवून दिले. त्यांनीच पाश्चात्त्य-युरोपीय-अभिजात साहित्य बोरकरांना रसिकतेने वाचायला लावले अशा या गुणीजनांच्या सहवासात बोरकर घडले. त्यांच्या सहवासात 'म्यूसची कवने' धुंदीत वाचली. एका कवितेत ते राणू नायक यांना म्हणतात,

> "जग गोड गमे तुझ्यामुळे ....
> कलावंत बहरती सहवासे"

दोना प्रार्पेसिया या बाई आणि प्रो. राणू नायक यांच्या आठवणी जागवणारे वृद्ध आजही गोव्यात हयात आहेत. जीवनातील सौंदर्यावर प्रेम करायला शिकविणारे म्हणून त्यांचा उल्लेख होतो. दोना प्रार्पसिया बाईंचे नव्वदी पार केलेले विद्यार्थी पुंडलिक चोडणेकर फोनवर म्हणाले, "बाई फार विद्वान होत्या. त्यांनी गोव्यातल्या काही पिढ्या घडविल्या. युरोपीयन भाषांची गोडी त्यांच्यामुळेच आम्हाला लागली."

महाराष्ट्रात इंग्रजी भाषेद्वारे आणि 'प्युरिटन' ब्रिटिश परंपरांद्वारा ज्या गोष्टी आणि जे विचार येत होते ते वेगळ्या युरोपीय भाषांतून, वेगळ्या परंपरांद्वारा गोव्यात येत. 'पोर्तुगीज साहित्य सरळ जानपद साहित्यातून उत्क्रांत झालेले आहे. त्यामुळे ते जोमदार, अकृत्रिम, रसरसते आणि मोकळेढाकळे आहे. मानवी संवेदनांचा मुक्त आविष्कार त्यात आहे'; असे मत 'लायसिएम'मध्ये पोर्तुगीज माध्यमातून शिकलेले इतिहाससंशोधक स. शं. देसाई यांनी आपल्या आत्मचरित्रात नमूद केले आहे. बोरकरांच्या कविता त्या संस्कारांतून भिजत आल्या आहेत.

इतिहासाच्या ओघात सर्वस्वी भिन्न संस्कृतीच्या लोकांची राजवट गोव्यावर लादली गेल्यावर जितांचा

प्रतिसाद दोन स्वरूपात प्रकट झाला. जेत्यांना शरण जाणं त्याच अनुकरण करण किंवा शक्य तेवढ धर्मरक्षण करून स्वत्व सांभाळण. दुसऱ्या प्रकारातही दोन छटा दिसून येतात. परसंस्कृती, परभाषा आणि परधर्मापासून शक्य तितके दूर राहण किंवा स्वत्व सांभाळताना जेत्यांच्या चांगल्या गोष्टी सुज्ञपणान आत्मसात करण. या प्रतिसादातून गोव्यात दोन वाङ्मयीन प्रवृत्ती उदयास आल्या. दामोदर अच्युत कारे आणि बाळकृष्ण भगवंत बोरकर हे दोन समकालीन कवी त्या दोन प्रवृत्तीच निदर्शक म्हणता येतील ते दोघेही एकाच धर्मातले, एकाच ज्ञातीतले. दोघांच्या वयात एका वर्षाचे अंतर आणि दोघे सवंगडी म्हणून एकत्र गप्पागोष्टी करणारे. पण दोघांच्या जीवनदृष्टीत आणि वाङ्मयवृत्तीत मोठा फरक पडला. कवी कारे पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव होता होई तो टाळणारे. बाहेरच्या कोलहलाशी ते मुकाबला करीत नाहीत; पण त्यात सामील ही होत नाहीत. ते आपले देशी अंतर्विश्व सहिष्णू भावाने सांभाळतात. त्यांचा 'नंदादीप' (१९३५) हा एकमेव कवितासंग्रह. त्याची शब्दकळा संस्कृतप्रचुर आहे. वृत्ती सात्त्विक, श्रद्धाशील आहेत. ते 'नंदादीप'च्या पहिल्याच कवितेत म्हणतात,

"दिनभर कोलाहल दारी तुझीया करिती
शिरावया तयामाजी अधीर न हा होईल
संथ ज्योतीमाजी जागो प्रीती अथांग अंतर
लय लागो ते एकान्ती विरो दृश्याचा पसारा
गूढ, मंद भाव–दीझि भरो मंदिर गाभारा"

गोव्यातल्या या कवीच्या काव्यात कुठेही चर्च, चापेल, इगर्जी, येशू, क्रूस नाही. गंभीर प्रार्थनेचे 'मिसा'चे सूर नाहीत. घंटानाद, तेवती मेणबत्ती नाही. शुभ्र परिवेषातील पाद्री नाहीत. मनाच्या खोल तळाशी जिथे कवितेचा जन्म होतो तिथे या प्रतिमा उमटलेल्याच नाहीत. भारतीय संस्कृतीचा विशुद्ध नंदादीप तेथे तेवतो आहे. याच विशुद्ध वृत्तीला स्वप्नात झालेल्या दृष्टांतांनुसार आपापल्या कुल-देवतांच्या मूर्तीची स्थलांतरे करीत रचत्व जोपासण्याची प्रेरणा मिळाली. कुलदेवांच्या स्थलांतराच्या किती तरी कथा गोव्यात आजही सांगितल्या जातात.

या उलट वृत्ती दिसते ती कवी बोरकरांची त्यांनीही आपल भाविक अंतर्विश्व जपलेल आहे, पण ब्राह्य प्रभाव टाळलेले नाहीत. 'गेले तेथे मिळले हो' ही या विश्व-नागरिकाची 'कॉस्मॉपालिटन' वृत्ती आहे. ग्रीकांच्या सौंदर्य-दृष्टीच, लॅटिन संस्कृतीतील इहवादी जाणिवाच देहाच्या भोगविलासाच, सामाजिक मनमोकळेपणाच निःसंकोच आकर्षण त्यांना आहे. आध्यात्मिकता आणि इहवादी जाणिवा यांचा चपखल म्हणा वा चतुर म्हणा मेळ ते घालतात. त्यांच्या कवितेत जीवनाचे भोग व भक्ती दोन्ही प्रकटते. 'रसलंपट जरी मी गोसावीपण मज भेटे अवचित' अस त्यांनी म्हटलेल आहे. याच वृत्तीन आंतरी भाविक असलेला गोमंतकीय समाज आधुनिक परिवेशात लीलया वावरतो. ही गोमंतकीय जीवनशैली आहे. बोरकर असे अभंगपणे गोमंतकीय कवी आहेत. म्हणूनच जी. ए. कुलकर्णी यांनी सुनीता देशपांडे यांना लिहिलेल्या एका पत्रात म्हटले आहे की, "गोवा म्हणजे बोरकरांची कविता आहे. नव्हे त्या सौंदर्याला स्वर मिळाला, पैंजण मिळाले ते बोरकरांमुळे. .... मला त्यांना भेटायचे आहे ते गोव्यातच, त्यांच्या गावी. जेथे माड नाहीत, समुद्राचा दमट, खारट चटका नाही, त्या ठिकाणी बोरकरांना भेटण्यात काय अर्थ आहे?" प्रादेशिक निसर्ग सौंदर्याशी आणि तेथील सामाजिक संवेदनशीलतेशी एकरूप होऊन जीवनाचा मनमुराद, रूचीने आस्वाद घेणारा दुसरा मराठी कवी विरळाच म्हणावा लागेल. गंगाधर गाडगीळ जिला 'वृत्तीची प्रादेशिकता' म्हणतात ती हीच असावी. या वृत्तीनेच त्यांच्या कवितेला मराठी काव्यविश्वात अनन्य स्थान लाभले असावे. त्या कवितेची सारी धुंदी, बेहोशी या वृत्तीतच आहे. याच वृत्तीने निःसंकोचपणे ते म्हणतात,

"ये हे सखि माताचे आश्वासन घेऊन ये
प्रीतीवर विश्वासून उन्मनमन होऊन ये
ये दिठीत, ये मिठीत, भेट पेट घेत जरा

शत ज्योतींमधुनि करू मातीचा हेत पुरा."

अशी ऐहिक सौंदर्याची आनंदयात्रा करीत कवी बोरकर ज़ीवन जगले. मात्र त्यांच्या अंतरीचा चिरंतनाचा ध्यास, आध्यात्मिक आच नाहीशी झाली नव्हती. 'मिळू दे मुळास माझ्या' याची ओढ लागल्यावर ते म्हणतात,

"विझवून दीप सारे मी चाललो निजाया
आता अशाश्वताची उरली मुळी न माया"

चितजडाची गाठ पडलेल्या माणसांना अशा दुहेरी आकर्षणाची ओढ वाटणे हे कदाचित आत्मविसंगत म्हणता येणार नाही. पण अशा कवीला गांधीवादाचे जे आकर्षण वाटते. त्याबद्दल धारवाडचे श्रेष्ठ कथाकार जी. ए. कुलकर्णी यांनी एक मार्मिक मुद्दा काढला आहे. ते म्हणतात, "एकाच व्यक्तिमत्त्वात अशा परस्परभिन्न प्रवृत्ती असू शकतात. पण त्यामुळे काही ताणही निर्माण होतात. त्या ताणाच दर्शन त्यांच्या साहित्यात घडायला हव. बोरकरांच्या साहित्यात संमिश्र व्यक्तिमत्त्वाची अपार समृद्धी आहे. पण जीवघेण्या ताणांचे दर्शन नाही."

यावर बोरकर म्हणतात, "माझ्या एकाच देहात दोन भिन्न व्यक्तित्वे सुखेनैव नांदू शकतात. त्यांच्यात काही तत्त्व निर्माण होत नाही. तसे होण्याचे कारणही नाही."

केवळ बुद्धिप्रामाण्याच्या वाटेने चालणाऱ्या सुशिक्षित महाराष्ट्रापेक्षा ही वेगळी जीवनदृष्टी आणि वेगळी अभिरुची आहे. बोरकरांना या गोष्टीची जाणीव होती. पु. शि. रेग्यांवरील श्रद्धांजलीपर लेखात या भिन्नतेवर त्यांनी बोट ठेवले आहे. ते म्हणतात "केशवसुत-मर्ढेकरांची सामाजिक जाणिवेची कविता मराठी रसिकांना जेवढी भावते तेवढी विशुद्ध संवेदनांत रममाण होणारी पु. शि. रेग्यांची क़विता भावत नाही." हे पु. शि. रेगे कवळ्याच्या शांतादुर्गेचे परमभक्त होते हा योगायोग नसावा. बोरकर यांची अभिरुचीही अशी वेगळी दिसते. गोमंतकीय रसिकतेला जसे आध्यात्मिक, भक्तीपर किंवा विद्वत्ताप्रचुर संत, पंत, साहित्य रुचले. तसे वीररसयुक्त व शृंगारप्रधान पोवाड्यांचे किंवा लावण्यांचे रांगडे शाहिरी वाङ्मय रुचलेले दिसत नाही. दशावतारी नाटकांवर पोसलेल्या या अभिरुचीला भजन, कीर्तनांची गोडी लागली जी पुढे संगीत पौराणिक नाटकात रमली. नवसाहित्य-नवकाव्य, नवकथा आणि नवनाट्य यांचीही विशेष मातब्बरी त्यांना वाटली नाही. ... नवकाव्याच्या जमान्यातही बोरकरांनी आपली धुंदीबद्ध गायकी सोडली नाही ती त्यामुळेच.

कवी बोरकर यांची जडणघडण झाली तो काळ, ती पोर्तुगीज राजवट, शिक्षणातील तो 'काँटिनेंटल पॅटर्न' आणि घरोघर चालू असलेल संतपंत साहित्याच पठण, श्रवण, तो भाषेद्वारा स्वत्व जोपासण्याचा ध्यास या गोष्टी आता पुन्हा येणार नाहीत. त्यामुळे बोरकरांसारखा कवी गोव्यातही पुन्हा होणे नाही, असं मत बोरकरांचे भाचे श्री. सुरेश आमोणकर मांडतात ते बरोबर वाटते. जी. ए. कुलकर्णी यांनी त्यांच्या प्रतिमासमृद्ध भाषेत बोरकरांच्या कवितेचा गौरव करताना म्हटले आहे, "बोरकर कवींची मूळ वृत्ती जीवनाच्या विविध स्वरूपाला 'होय' म्हणण्याची. चांगल्या अर्थाने भोगवादी, ऐंद्रिय अनुभवांनी धुंद होण्याची, आणि तो धुंद आनंद तितक्याच जिवंत उष्ण रक्ताच्या शब्दांत मांडण्याची;" या मूळ वृत्तीवर त्या काळानं जे आध्यात्मिक संस्कार केले त्यातून समग्र गोमंतकीय बोरकर अवतरतात. ते तसेच वाढत जाते तर त्यांच्या सौंदर्यवादी कवितेने वेगळी उंची गाठली असती. परंतु त्यांचे एक दैवत भाऊसाहेब खांडेकर या महाराष्ट्रीय कादंबरीकाराच्या आदर्शवादाच्या प्रभावाने ते त्या उंचीप्रत जाऊ शकले नाहीत, हे श्री. सुरेश आमोणकरांचे मतही मला चिंत्य वाटते. खुद्द भाऊसाहेब खांडेकरांनीच एका मुलाखतीत जयवंत दळवींना म्हटले होते की, "मी जर मास्तर झालो नसतो आणि आगरकरांच्या मुठीत गेलो नसतो तर मी वेगळाच कादंबरीकार झालो असतो." ही मराठी साहित्याची वेगळी दिशा गोमंतकीय कवी बोरकर यांची रससशीत कविता दाखविते आणि मराठी साहित्य पुरेसे परपुष्ट नसल्याची मर्ढेकरांची खंत थोडी कमी करते.






**संदर्भ–साहित्य :**

१. 'अनुष्टुभ' (कै. पु. शि. रेगे विशेषांक) सं. म. सु. पाटील, धुळे, १९७८.

२. 'गोमंतक मराठी साहित्य संमेलन अध्यक्षीय व स्वागताध्यक्षीय भाषणे', सं. सोमनाथ कोमरपंत, पणजी, गोवा, १९९२.

३. 'गोमंत शारदा', सं. रामदास प्रभू, प्रस्तावना – बा. भ. बोरकर, पणजी, गोवा, १९७२.

४. 'घुमटावरले पारवे', बा. भ. बोरकर, प्रिया, मुंबई, १९८६.

५. 'चांदण्यांचे कवडसे', बा. भ. बोरकर, पुणे, १९८३.

६. 'जी. ए. ची निवडक पत्रे', खं. १, सं. म. द. हातकणंगलेकर, मौज, मुंबई, १९९५.

७. 'परममित्र', जयवंत दळवी, मॅजेस्टिक, मुंबई, १९९६.

८. 'प्रा. रामचंद्र शंकर तथा राणू नायक स्मृतिग्रंथ', सं. गणाधीश खांडेपारकर, पणजी, गोवा, १९७२.

९. 'वाकीबाब : एक आनंदयात्रा', सं. कृष्णाजी कुलकर्णी, पणजी, गोवा, २००३.

१०. 'बोरकरांची कविता', सं. मंगेश पाडगावकर, मौज, मुंबई, १९६०.

११. 'भारत'कार हेगडे–देसाई यांचे निवडक अग्रलेख, खं. १, सं. शशिकान्त नार्वेकर, पणजी, गोवा, १९९९.

१२. 'मागोवा', रवीन्द्र घवी, राजहंस वितरण, पणजी, गोवा, १९९८.

१३. 'स्मृतिग्रंथ', स. शं. देसाई, कोल्हापूर १९८८.

☆☆☆

---



अनुक्रमणिका



# सन २०१० मध्ये 'भावीण' वाचल्यावर ......

– रोहिणी तुकदेव

'माझा मृत्यू हा जीवनाचा अत्युच्च आनंदसोहळा आहे. माझ्यासाठी रडू नका. जी देवीची प्रतिमा झाली तिने लौकिक जीवनाची आशा करण्यात अर्थ नाही. .... आईबाप, कुटुंब, समाज, पूर्वस्नेह या सर्वांना तुडवून स्वीकारलेले प्रेम स्वतःच्याच शापाने दग्ध होते आणि आध्यात्मिक संपत्ती गमावून बसते. समाजात सुधारणा झाली पाहिजे; पण ती लादून झगडून होत नाही. त्यासाठी त्याचा हृदयपालट केला पाहिजे आणि तो शुद्ध त्यागालाच करणे शक्य आहे. मी या बाबतीत अल्पसा प्रयत्न करीत आहे. भाविणीलाही थोर निष्ठा असू शकते असे सिद्ध झाले तर समाज नेहमीच काही अंध राहणार नाही...'

सधन, ब्राह्मण कुटुंबातील कर्तबगार तरुणाने जिच्याशी विवाह करण्याचे पक्के ठरविले आहे अशा भाविणीने आत्महत्या करताना लिहून ठेवलेल्या पत्रातील हा मजकूर आहे. एक सर्वसामान्य समाजाने धिःकारलेल्या, अधः-स्तरावरील जमातील जन्मलेली भाविण 'देवी'च्या प्रतिमा होऊ शकते असा विश्वास देणाऱ्या आणि त्यागाने समाजाचा हृदयपालट होऊ शकेल असा दिलासा देणाऱ्या 'भावीण' कादंबरीतील नायिकेच्या उदात्त आत्मबलिदानाच्या वेळी तिने आपल्या भावी नवऱ्याला उद्देशून लिहिलेल्या पत्रातील हा मजकूर या कादंबरीत चित्रित केलेल्या सामाजिक परिस्थितीबद्दल भाष्य करतो. हे भाष्य आणि बा. भ. बोरकरांच्या 'भावीण' कादंबरीचा एक सामाजिक प्रश्न मांडणारी कादंबरी म्हणून केलेला विचार या लेखात अभिप्रेत आहे.

बा. भ. बोरकरांनी एकंदर सहा कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकी 'काचेची किमया' आणि 'जळते रहस्य' या अनुवादित आहेत. स्टीफन झ्वाइग या सुप्रसिद्ध पोर्तुगीज लेखकाच्या कादंबऱ्यांचे मूळ भाषेतून केलेले हे अनुवाद आहेत अशी माहिती सांगितली जाते. या दोन्ही कादंबऱ्या आज उपलब्ध नाहीत. 'अंधारातील वाट', 'मावळता चंद्र' आणि 'प्रियकामा' या त्यांच्या स्वतंत्र कादंबऱ्या उपलब्ध आहेत खऱ्या पण; त्यांना रसिकांची फारशी दाद मिळालेली दिसत नाही. 'भावीण' हीच त्यांची कादंबरीकार म्हणून ओळख निर्माण करणारी कादंबरी होय.

१९५० साली प्रकाशित झालेल्या या कादंबरीच्या तीन आवृत्त्या निघाल्या. हिंदी, बंगाली, तमीळ, कानडी या भारतीय भाषांत तिचे अनुवाद झाले. प्रकाशित झाल्या झाल्या लगेचच 'भावीण' परस्परविरोधी प्रतिक्रियांच्या भोवऱ्यात सापडली. प्रकाशित झालेल्या वर्षी गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचे सुवर्णपदक तिला मिळाले. या संमेलनात दोन संमेलनांच्या मधल्या काळात प्रसिद्ध झालेल्या गोमंतकीय लेखकाच्या उत्कृष्ट मराठी पुस्तकाला सुवर्णपदक देण्यात येत असे. त्या वर्षी सुवर्णपदकासाठी पुस्तकाची निवड करण्याचे काम व्यासंगी समीक्षक रा. श्री. जोग यांच्याकडे होते. त्यांनी 'भावीण' कादंबरीची सुवर्णपदकाची मानकरी म्हणून निवड केली. या निवडीमुळे एक चमत्कारिक पेचप्रसंग उभा राहिला. झाले असे की, संमेलनाचे स्वागताध्यक्ष बा. द. सातोस्कर यांचे 'भावीण' विषयी मत फारसे चांगले नव्हते त्यामुळे आपल्या नियोजित भाषणात त्यांनी 'भावीण'पर खरपूस टीका केली होती. 'अवास्तवता, कृत्रिमता व बांधेसूदपणाचा अभाव हे दोष मला तीत आढळले. गोमंतकाचे यथार्थ

अनुक्रमणिका

दर्शन घडविण्यास भावीण समर्थ ठरू शकली नाही. गोमंतकातील देवदासी वर्गाची शेवंती भावीण जशी प्रतिनिधी नाही, तसे कमला, केशव, हृषी हेही तरुण गोमंतकाचे प्रतिनिधी नाहीत. अपवादभूत पात्रांच्या जीवनातील अपघातांवर उभी राहिलेली आणि भाषेच्या व मानवतावादी विचारांच्या वस्त्राभरणांनी कायेची असुंदरता झाकलेली प्रसन्नवदना अशी ही बोरकरांची भावीण आहे. पण भाविणीच्या जनकाचा त्यात मुळीच दोष नाही. कादंबरी हे माध्यम बोरकरांच्या प्रतिभेला अनुरूप नाही, हे याचे कारण आहे. त्यांचा ध्येयवाद, प्रतिभेची प्रखरता, विचारांची झेप, स्वप्नरंजनाची आवड व भाषेचे अनन्यसाधारण लालित्य ही काव्याची भूषणे ठरतात. कादंबरीची नव्हेत' असा सातोस्करांचा अभिप्राय होता. त्यांच्या भाषणाच्या मुद्रित प्रती सम्मेलनात वाटण्यासाठी तयार झाल्या होत्या. सुवर्णपदकासंबंधीचा निकाल हाती आल्यावर सम्मेलनाच्या संयोजकांच्या मनामध्ये गोंधळ निर्माण झाला. या दोन परस्पर गोष्टींचा मेळ कसा घालावयाचा ते त्यांना समजेना. 'भावीण' कादंबरीवरील टीका गाळावयाची तरी कशी? असा प्रश्न उभा राहिला. बोरकर आणि सातोस्कर हे दोघेही मित्रच होते. अखेरीस सातोस्करांनी यातून मार्ग काढला. कादंबरीतील चांगल्या गोष्टी दाखवणारा थोडा मजकूर त्यांनी लिहिला व तो छापून घेऊन ते पान मुद्रित भाषणात चिकटविले.

दुसऱ्या दिवशी सम्मेलनामध्ये प्रथम स्वागताध्यक्षांचे भाषण झाले. त्यानंतर अध्यक्षांनी म्हणजे प्रभाकर पाध्यांनी 'भावीण' कादंबरीला सुवर्णपदक देण्यात आल्याचे जाहीर केले आणि बा. भ. बोरकरांनी ते स्वीकारावे अशी विनंती केली. दुसऱ्यांदा नावाचा पुकारा केल्यावर बोरकर उठले व व्यासपीठावर न चढता खाली उभे राहून ते सुवर्णपदक त्यांनी घेतले काहीतरी पुटपुटत त्यांनी ते अध्यक्षांच्या टेबलावर फेकले. टेबलावर आपटून ते पदक घरंगळत खाली पडले. सारे लोक हा प्रसंग पाहून स्तंभित झाले. पुढे कादंबरीच्या तिसऱ्या आवृत्तीपर्यंत बोरकरांचा रोष संपलेला दिसतो. कादंबरीच्या प्रारंभीच 'भावीण प्रसिद्ध झाली आणि थोड्याच दिवसांनी तिला गोमंतक साहित्य सम्मेलनाचे प्रथमश्रेणीचे सुवर्णपदक मिळाले.' असे ते या आवृत्तीच्या प्रारंभीच्या 'दोन शब्द' मध्ये प्रसन्नपणे सांगतात. या कादंबरीच्या गुजराती आवृत्तीच्या प्रस्तावनेत श्रीयुत उमा शंकर जोशी 'मानवहृदयाची कथा' असे भाविणीचे वर्णन करतात आणि या कादंबरीतील कथेच्या प्रवाहांना नीतिविचाराचा प्रवाह जोडण्याचे कौशल्य पाहून रविंद्रनाथ किंवा गोवर्धनराम यांची आठवण होत असल्याचे सांगतात. प्राध्यापक कुसुमावती देशपांडे यांनीही या कादंबरीचा गुणगौरव केला आहे. या कादंबरीतील कथानैपुण्य, शब्दकळा, सौंदर्यसृष्टी आणि मानवी मनोवृत्तीविषयी समजही महत्त्वाची वैशिष्ट्ये त्यांना प्रभावित करतात. प्रा. अ. ना. देशपांडे यांना ही कादंबरी सुमार दर्जाची वाटली. त्यामुळे त्यांनी तिच्यावर प्रखर टीका केली. भावीण कादंबरीवर ही जी उलटसुलट टीका झाली. तिचा परामर्ष घेणे किंवा त्यांतील कोणत्यातरी बाजूचे समर्थन करणे हा या लेखाचा हेतू नाही. बोरकरांनी या कादंबरीमध्ये जे जग आणि जीवन उभे केले आहे, त्यांतून आणि त्यांतील व्यक्तींच्या परस्परसंबंधांतून, संभाषणांतून लेखकाची कोणती भूमिका प्रतीत होते तसेच आज म्हणजे २०१० साली ही कादंबरी आपल्याला कोणत्या प्रकारचे संवेदन देते याचे विवेचन करणे या लेखात अभिप्रेत आहे.

भावीण ही गोमंतकातील स्त्रियांची जमात. धर्मसंस्था आणि पुरूषसत्ताक समाजव्यवस्था यांच्या संगनमतातून तयार झालेली एक उपव्यवस्था. धर्माने मान्य केलेल्या मूर्तिपूजेच्या तत्त्वांतून निर्माण झालेली मंदिर संस्कृती आणि पुरुषांच्या अनिर्बंध कामवासनेला मान्यता देऊन

तिच्यासाठी विवाहसंस्था शिथिल करून काही एक वाट निर्माण करणारी पुरुषसत्ताक व्यवस्था, यांच्या संगनमतातून ही उपव्यवस्था निर्माण झाली. मंदिराची स्वच्छता ठेवणे. गाभाऱ्यातील समईतील दिवे सतत तेवत ठेवणे, पूजेसाठी फुले गोळा करणे, त्यांचे हार बनवणे, देवीपुढे नृत्य आणि गायन करून देवीची स्तुती करणे अशी कामे भाविणींच्यासाठी निश्चित करण्यात आली. देवीवर त्यांची अहोरात्र निष्ठा असली पाहिजे म्हणून त्यांना विवाहसंस्था आणि कुटुंबसंस्था यांतून मोकळीक देण्यात आली. नेमक्या याच मोकळीकीमुळे पुरुषांच्या स्वैर वासनांची सोय झाली. भावीण, जोगतीण, कलवातीण, देवदासी ही सगळी एकाच उपव्यवस्थेची स्थानभेदामुळे थोडाफार फरक असलेली भिन्न भिन्न रूपे आहेत. या उपव्यवस्थेमुळे स्त्रियांच्या स्वतंत्र व्यक्ती म्हणून असलेल्या अधिकाराचा नाश झाला; आणि दमनाचे वेगळे रूप निर्माण झाले. भावीणीच्या या उपव्यवस्थेला केंद्रस्थानी ठेवून बोरकरांनी कादंबरीची रचना केली आहे.

शेवंती ही भाविणीची मुलगी या कथेची नायिका आहे. ती इतकी सुंदर आणि सोज्ज्वळ आहे की, अंताशेट हा मूर्तिकार देवीचा मुखवटा तयार करण्यासाठी शेवंतीचा चेहरा समोर ठेवतो. ती इतकी उत्तम गायिका असते की, तिने गायलेले अभंग ऐकून श्रोते मंत्रमुग्ध होतात; ती इतकी प्रामाणिक असते की, केशवावर प्रेम जडल्यावर पोर्तुगीज न्यायाधीशाला आता पैसे पाठवू नको असे स्पष्टपणे कळवते. ती इतकी निष्ठावंत असते की, केवळ केशवाने सांगितले आहे म्हणून; मनोरूग्ण झालेल्या हृषीची तन-मनाने सेवा करते. त्याच्या शुश्रुषेत देह समर्पित करते. ती इतकी कनवाळू असते की, महार-वाड्यातील मुलांना एकत्रित करून त्यांचे जीवनमान सुधारावे म्हणून शाळा सुरू करते. ती इतकी संवेदनशील असते की, तिच्यामुळे प्रभावित झालेला हृषी कुटुंबांतील सर्वांचा विरोध पत्करून तिच्याशी विवाह करण्याचे ठरवतो तेव्हा त्याच्या व रंजनेच्या संसारसुखाचा मार्ग मोकळा व्हावा म्हणून तळीत उडी मारून आत्मबलिदान करते. अखेरच्या क्षणी जेव्हा सारे लोक जवळ येतात तेव्हा पाण्यात भिजलेल्या पारिजात पुष्पांच्या झेल्याप्रमाणे ती दिसत असते. सर्वांकडे पाहून ती गोड हसते. 'मी आनंदाने जाते. माझ्यासाठी रडू नका;' असे म्हणून हात जोडते आणि गाढ झोप आल्याप्रमाणे डोळे मिटते. अशी ही शेवंती! बोरकरांनी उत्तम, उन्नत आणि उदात्त गुणांचा समुच्चय तिच्याठायी कल्पिला आहे.

शेवंतीला असे उदात्त बनविण्यामागे बोरकरांची निश्चित अशी भूमिका आहे. या कादंबरीचे बीजारोपण कसे झाले हे सांगताना बोरकर लिहितात की, 'रक्ताने माझी आतेबहीण असलेल्या एका भाविणकन्येची हृदय-द्रावक शोकांतिका मला माझ्या आईच्या तोंडून कळली आणि ब्राह्मणाच्या आणि सुसंस्कृततेच्या अभिमानात माझ्याकडून झालेल्या तिच्या उपेक्षेच्या अनुतप्त जाणीवेतून या कादंबरीचे बीजारोपण झाले.' कादंबरी लिहिल्यामुळे प्रमादपरिमार्जन झाल्याचे समाधानही ते नोंदवतात.

स्वत:च्या भावनिक पातळीवर का होईना; भाविणीला न्याय देण्याच्या ऊर्मीतून या कादंबरीची कल्पना बोरकरांच्या मनात निर्माण झाली. आईने सांगितलेल्या हकीकतीत, त्यांच्या आजोबांच्या मृत्यूनंतर, त्यांच्यावर प्रेम करणारी भावीण विधवेसारखे जीवन जगत होती. हा 'निष्ठा' गुण किंवा हे मूल्य भाविणीला गरतीची प्रतिष्ठा देऊ शकेल अशी भूमिका 'भाविणी'त साकार झाली आहे. शेवंती हे मूल्य अंगिकारते आणि 'देवीपदा'ला पोहोचते. अंताशेटने आणि केशवनेही तिचा 'देवी' म्हणून गौरव केला आहे. ही भूमिका तशी नवी नाही. धर्माचे अधिष्ठान या भूमिकेला आहे. शेवंतीला धर्मानुसार वागावयाचे आहे. एके ठिकाणी ती प्रार्थना करते, '... माते शांते!






मला माझ्या धर्माप्रमाणे जगण्याची शक्ती दे. माझ्या भस्माची विभूती होईल असे कर.' (पृ. १०२) तिचा धर्म म्हणजे काय याचा उलगडाही तिच्या आणि आईच्या संवादातून होतो. ती आईला म्हणते, 'आई, तू एकदा म्हटल होतस की आम्ही भावणींनी भावना द्याव्या. त्या मिळण आमच्या नशिबी नाही. मला आता कळून चुकल आहे की, त्यांची अपेक्षा न करता त्या देण हाच धर्म आहे; आणि म्हणून तो बलीधर्मापेक्षाही दुर्धर आणि थोर आहे. या नव्या जाणिवेन तो मला आचरायचा आहे. धर्माचा आम्ही धंदा केला आणि म्हणून आमची अवनती झाली!' (पृ. १०३) शेवंतीची ही भाषा धर्माची भाषा आहे. परंतु; ती सांगत असलेला धर्म हा पारंपरिक धर्म नाही. पारंपरिक धर्म काय सांगतो हे तिला माहीत आहे. कारण दररोज शिवलीलामृतातील ११ वा अध्याय वाचणे हा तिचा परिपाठ आहे. ११ व्या अध्यायात महानंदेची कथा आहे. 'वेश्या असूनि पतिव्रता। नेमिला जो पुरुष तत्त्वतां। त्याचा दिवस न सरतां। इंद्रासही वश्य नव्हे (४६) महानंदेचे सत्व पाहण्यासाठी शंकर सौदागाराचा वेष घेऊन येतो. तिच्या हातात पृथ्वीमोलाचे कंकण घालतो तेव्हा; 'तीन दिवस मी तुमची दासी झाले' असे महानंदा म्हणते. एवढ्यात नृत्यशाळेला आग लागते आणि त्यात तो सौदागर उडी घेतो. हे पाहिल्यावर महानंदा आपल्या संपत्तीचे दान करते आणि नि:शंकपणे आपणही अग्नीत उडी घेते. भगवान शंकर तिला वरचेवर वाचवतो. आणि अशा प्रकारे महानंदेला शिवपदाची प्राप्ती होती अशी कथा ११ व्या अध्यायात आहे. शेवंतीची विचार करण्याची रीती अथवा तिची जीवनकथा महानंदेच्या कथेची आधुनिक काळातील आवृत्ती नाही. किंबहुना पारंपरिक धर्माची आचारप्रणाली शेवंतीला फारशी मान्यही नाही. पारंपरिक प्रथा मोडून आणि प्रामुख्याने केशवच्या भूमिकेने प्रभावित होऊन शेवंती सार्वजनिक कार्य करू लागते. महारवाड्यात जाऊन तिथल्या लोकांशी सेवा करू लागते. मुलीबाळींना लिहिण्या-वाचण्यास शिकविते. शिवण-टिपण शिकविते. एवढेच नव्हे तर या तिच्या वागण्यावर एकदा भटजी आक्षेप घेतात. तेव्हा ती त्यांना झणझणीत उत्तर देते. 'येते ती चांगली न्हाऊन धुवून धूतवस्त्रात येते. बाकी गंगेला आणि भाविणीला कसलाच विटाळ नसतो ना? भाविणीच्या घरून आलेल्याला देवीच्या गाभाऱ्यात काही मज्जाव नसतो.' (पृ. ८६) शेवंतीचा हा टोमणा पारंपरिक धर्मविचाराशी जुळणारा नक्कीच नाही.

शेवंतीचा मृत्यू ही या कादंबरीतील अत्यंत महत्त्वाची घटना आहे. ती आत्महत्या करणारी भ्याड मुलगी नाही तसेच ती दुबळ्या मनाचीही नाही. एखाद्या तीव्र भावनेच्या आहारी जाऊन अविचारीपणे केलेले कृत्य असेही तिच्या मृत्यूबाबत म्हणता येत नाही. अत्यंत जाणीवपूर्वक ती आत्मबलिदान करते. हृषीबरोबर विवाह करून प्रतिष्ठित जीवन जगण्याची संधी मिळत असतानाही हृषीचे आपल्या-वर खरे प्रेम नाही आणि आपल्या मनातही केशवबद्दलच प्रेमभावना आहे या वस्तुस्थितीचा विचार करून ती देहत्याग करते आणि रंजना यांच्या संसारसुखाचा मार्ग मोकळा करते. हे तिचे वागणे पारंपरिक धर्मजाणिवेच्यापेक्षा अगदी वेगळे आहे.

१९ व्या शतकामध्ये ब्रिटिश राज्यकर्त्यांनी इथल्या धार्मिक चालीरीती आणि प्रथा कशा अन्यायकारक आहेत. हे दाखवून देऊन त्यांच्याविरोधी काही कायदेही केले. देवदासीप्रथाविरोधी कायदा किंवा गोव्यातील रोस भरणे विरोधी कायदा ही त्याचीच उदाहरणे होत. कायद्याने अशी बंदी आली तरीही या प्रथा, रूढी चालूच राहिल्या नवशिक्षितांनी या रूढी परंपरांविरुद्ध जनजागरणाची मोहिम उघडली. प्रामुख्याने धर्माच्या कचाट्यात सापडलेल्या स्त्रियांवरील अन्याय नष्ट करण्याची जाणीवच त्यामध्ये

होती. ब्रिटिशांच्या भूमिकेचे प्रतिध्वनी स्वरूप असे हे विचार होते. बोरकरांनी 'भावीण' कादंबरीत जे जीवन उभे केले आहे ते पाहता आणि शेवंती, केशव, ह्षी या महत्त्वाच्या व्यक्तीरेखा लक्षात घेता बोरकरांची भूमिका वर उल्लेखलेल्या वसाहतवादी विचारांशी जुळणारी नाही. मात्र याचा अर्थ असा नव्हे की, बोरकरांना भाविणीची ही प्रथा चालू राहावी असे वाटत होते. काकासाहेब कालेलकरांना भावीण कादंबरी आवडली होती; तरीही ते बोरकरांना उद्देशून म्हणाले होते की, 'भाविणीच्या दुर्दैवी संस्थेसंबंधाने सहानुभूती उत्पन्न करण्याच्या प्रयत्नात तुम्ही तिला इतकी आदर्शायण बनवली आहे की, जणू काय ही संस्था कायम टिकावी असाच तुमचा अभिप्राय असावा.' भावीण संस्था टिकावी असं संवेदन कादंबरी देत नाही. भाविणींच्या संदर्भात समाज जी वर्तणूक करतो, तिचा निषेध कादंबरीत अनेक ठिकाणी आहे. शेवंतीशी विवाह करण्याचे ठरविल्यावर, आपल्या आईबरोबर बोल-ताना ह्षी म्हणतो, "... मला तिन माणसात आणून सोडलं तसं तिला देखोल माणसात आणण्याची आपल्यावर जबाबदारी आहे. समाजाला भाविणीची जात पाहिजे, तिच्याशी चोरटे संबंधही ठेवायला हवेत आणि वरून तिचा तिरस्कार करीत स्वतःचा सोज्वळपणा मिरवायला पाहिजे, तुला हे सार ठीक वाटत का आई?" (पृ. १५३) याच विषयावर आपल्या मित्राशी, केशवशी बोलताना ह्षी अगदी तळतळून बोलतो. तो म्हणतो, "... एखाद्या स्त्रीकडे पुरुष आकृष्ट झालेला दिसला म्हणजे त्यात आपल्या लोकांना लंपटतेपलीकडे काही दिसत नाही. याचं कारण वर्षानुवर्ष आपण स्त्रीकडे उपभोग्य वस्तू म्हणूनच पहात आलो आहे. पराक्रमाला पारखा झालेला, सृजनशीलता गमावून बसलेला समाज किंवा व्यक्ती अन्य दृष्टीने स्त्रीकडे पाहूच शकत नाही. त्याच्या जीवनाच आरोग्य नष्ट होत. भोगावर पापाचा शिक्का मारून तो स्वतःला सावरू पहातो आणि भोग न सुटल्यामुळे त्याला चोरटेपणाने शरण जाऊन खरोखरच पापाचा धनी होतो. भोग दिसल्यावर लाळ घोटायची, धोके टाळून तो मिळ-वायचा आणि शेवटी कृतघ्नपणे शिव्याशाप द्यायचे हे आहे आपल तत्त्वज्ञान." (पृ. १६०) ह्षी ही या कादंबरी-तील महत्त्वाची व्यक्ती आहे. आणि त्याच्या तोंडची भाषा सुधारणावादी विचारांची आहे. एकोणिसाव्या शतकात वेगळ्या पद्धतीचे शिक्षण घेतलेली, नव्या विचारांनी प्रभावित झालेली, आपल्या समाजाकडे, प्रथा-परंपरेकडे चिकित्स-कपणे पाहून त्यातील दोष निर्भीडपणे मांडणारी तरुण पिढी तयार झाली. त्यांनी समाजाला डोळस बनविण्याचा उपक्रम अंगिकारला. ह्षीची भाषा या पठडीतील आहे. शिवाय, तो केवळ वाचावीर नाही. कुटुंबातील प्रिय व्यक्तींचा विरोध पत्करून तो भाविणीशी विवाह करण्याचे ठरवितो. कादंबरीत या घटनेला दिलेले महत्त्व लक्षात घेता, भावीण संस्था कायम टिकावी असा लेखकाचा अभिप्राय असावा या म्हणण्यात तथ्य उरत नाही.

इथल्या अन्याय्य प्रथा कायद्याने बंद करण्याच्या ब्रिटिशांच्या धोरणाचे व सुधारणावादी विचारांच्या प्रसाराचे अगदी वेगळे पडसादही समाजात उमटले. त्यांचे या कादंबरीत काही प्रमाणात दर्शन घडते. 'शेसविधी कायद्यान बंद झाला, मुंबईत काही भाविणींची लग्नही झाली, तेव्हा आता तुमचे धिंडवडे थांबतील' असं गप्पांच्या ओघात सुचविणाऱ्या अंताशेटला उद्देशून शेवंतीची आई फुलवंती म्हणते, 'पिढ्यांची इस्टेट करून ठेवून आमच्यासारख्यांना लग्नाचा उपदेश करायला काय जातय् या पुढाऱ्यांचं? माझ्यासारख्या गरीब भावीणीच्या मुलीशी बाशिंग बांधायला या पुढारी म्हणविणाऱ्यापैकी आहे का कोणी तयार? धिंडवडे आणि सत्यानाश थांबणार म्हणे! काही थांबणार नाही. वाढणार आहे उलट. धर्म म्हणून









करत होतो तेच पुढे अधर्म म्हणून कराव लागणार आणि शेवटी कुलक्षय होणार आमचा.' (पृ. २२) घाईघाईने सुधारणा घडवून आणू पहाणारे लोक जुन्यातील अभद्र तर संपवीत नाही-तच, उलट तेच प्रश्न अधिक विदारक करतात अशा प्रकारची एक भूमिका विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात घेतली गेली. देवदासी प्रथेवर कायद्यान बंदी आली. याचा परिणाम होऊन या व्यवहाराला असलेले धर्माचे संरक्षण आणि प्रतिष्ठाही संपली मात्र पुरुषसत्ताक व्यव-स्थेने पुरुषांना दिलेले विशेषाधिकार संपले नाहीत. त्यांच्या दमनशक्तीही प्रबळ राहिली. परिणामी केवळ पैशांवर अथवा धनाच्या मोबदल्यावर चालणारा मानवी देहाचा व्यापार आणि खुला वेश्याव्यवहार सुरू झाला. ही परिस्थिती अधिक घृणास्पद आहे आणि अशी भूमिका काही विद्वानांनी घेतली. डॉ. श्री. व्यं. केतकरांनी 'विचक्षणा' कादंबरीत ही भूमिका मांडली आहे. 'भावीण' कादंबरीत संवादाचा भाग म्हणून ही भूमिका डोकावते.

वर सांगितलेल्या भूमिकांपेक्षा वेगळी भूमिका 'भावीण' मध्ये प्रकर्षाने जाणवते. त्या भूमिकेवर म. गांधींच्या भूमिकेचा प्रभाव आहे. आत्मत्याग, आत्मक्लेश आणि सहनशीलता यांमुळे स्त्रियांचे जीवन उदात्त, मंगल बनते अशी गांधीजींची धारणा होती. बा. भ. बोरकरांच्यावर गांधीजींच्या तत्त्वविचारांचा आणि व्यक्तिमत्त्वाचा मोठा प्रभाव होता. त्यांच्या कवितांवरही हा प्रभाव स्पष्टपणे दिसतो. 'भावीण' कादंबरीतल्या जीवनचित्रणामध्येही हा प्रभाव पाहता येतो. आपल जीवन उदात्त होण्यासाठी आणि प्रेमभावनेच्या पावित्र्यासाठी शेवंती स्वतःच्या सुखांचा त्यांग करते. आत्मबलिदान करते. हृषीबरोबर लग्न करून प्रतिष्ठेचे जीवन जगण्याची संधी आलेली असूनही ही आत्महुती देते. शेवंतीच्या आयुष्याचे पर्यवसान गांधींच्या विचारांच्या अनुरोधाचे द्योतक आहे.

कादंबरीतील केशव गांधीवादी विचारांना अनुसरणारा तरुण कार्यकर्ता आहे. तो महारवाड्यात शाळा सुरू करतो. देवीच्या पालखीची मिरवणूक महारवाड्यातून नेली पाहिजे असा आग्रह धरतो. प्रसंगी बंडही करतो. केशव ही कादंबरीतील महत्त्वाची व्यक्ती आहे. सभोव-तालच्या परिस्थितीमध्ये बदल घडवून आणण्याचा त्याचा प्रयत्न असतो. आपण भाविणीबरोबर लग्न करण्याच्या घेतलेल्या निर्णयाला केशव पाठिंबा देईल असा हृषीला विश्वास असतो. केशवचा सर्वच लोकांवर प्रभाव असतो. ते त्याच्या सल्ल्यानेच घरातील निर्णयही घेत असतात. इतके सारे जुळून येऊनही कादंबरीची नायिका शेवंती विवाह करीत नाही; उलट स्वेच्छेने मरणाचा मार्ग पत्करते. अशा प्रकारे त्याग, सेवा आणि आत्मबलिदान यांच्या साहाय्याने उदात्त बनलेल्या भाविणीच्या जीवनाचा एक नमुना कादंबरीत उभा राहतो. भाविणीच्या जीवनातून स्वैर्यता, विषयवासना आणि स्वार्थ काढून टाकल्यावर तिच्यात भावीणपण राहण्याची शक्यताच संपते; असा हा विचार आहे. हिंदुधर्मातील क्रूर आणि अन्याय्य प्रथा आणि रूढी यांच्यातील दोषास्पद भाग काढून टाकला की, हिंदुधर्माचे मुळचे उदात्त रूप टिकून राहिल अशी गांधीजींची भूमिका होती. माणसाच्या क्रौर्यातून आपल्याला माणसाची सुटका करावयाची आहे असे गांधीजी म्हणत 'भावीण' कादंबरीतील जीवनचित्रणात गांधीजींच्या या भूमिकेचे पडसाद उमटलेले दिसतात.

१९५० मध्ये प्रकाशित झालेली ही कादंबरी सन २०१० मध्ये वाचल्यावर एक वेगळीच प्रतिक्रिया मनात उमटते. पुरुषसत्ताक व्यवस्थेने पुरुषाचे शारीरिक सुख अनिर्बंधपणे मिळविण्याचे स्वातंत्र्य अबाधित ठेवण्यासाठी स्त्रियांवर मर्यादा घालणाऱ्या सामाजिक संस्था निर्माण केल्या. त्याचप्रमाणे काही स्त्रियांना मुद्दामच मोकळे ठेवले. दोन्ही नमुन्यांमध्ये पुरुषांच्या सुखाचाच विचार पुढे होता. धर्मसंस्था, संरजामशाहीव्यवस्था आणि साम्राज्यसत्ता

ह्या सर्वांनी आपली धोरणे ठरविताना पुरुषसत्ताक व्यवस्थेला अनुकूल अशीच ठरविली. लोकशाही व्यवस्था पत्करल्यानंतरही आपल्या समाजाने वरील धोरणात बदल केला आहे. असे दिसत नाही. महाराष्ट्रातील बारबालांच्या नृत्यावर बंदी घालणाऱ्या कायद्याचे स्वरूप पाहिले व ह्या कायद्याने कोणाकोणाला सवलत दिली आहे ते पाहिले की, या गोष्टीचा पडताळा येतो. 'भावीण' वाचल्यावर जाणवते ते असे की, प्राचीन काळापासून ते आजपर्यंत स्त्रीला स्वतःच्या शरीरावर अधिकार नाही. त्यासंबंधीचे सारे निर्णय दुसरी व्यवस्था घेते. उदार मानल्या जाणाऱ्या भूमिकेतही स्त्रीला ह्या अधिकारापासून वंचित ठेवून आत्मत्याग, सेवाभाव इ. मूल्यांच्या मात्रा तेवढ्या दिल्या आहेत.

आता पुन्हा एकदा आपण लेखाच्या प्रारंभी उद्धृत केलेल्या पत्राकडे वळू. हे पत्र शेवंतीने विचारपूर्वक लिहिलेले आहे. समाजात सुधारणा झाली पाहिजे असे तिला वाटते पण त्यासाठी संपूर्ण परिवर्तन घडवून आणणारी काही कृती करावी असे तिला वाटत नाही. आपण त्याग करून भाविणीलाही थोर निष्ठा असू शकते असे सिद्ध केले तर समाज आपणहून 'भावीण' समाजाला न्याय्य वागणूक देईल अशी भाबडी आशा ती करते. व्यक्तींनी व्यवस्थेला विरोध न करता, स्वतःच्या सुखांचा त्याग करावा म्हणजे त्यांचे जीवन उदात्त, उन्नत होईल आणि व्यवस्थाही कधीतरी आपणहून बदलेल अशा या भाबड्या आशावादाची गुटिका घेतली तर सहस्र वर्षानंतही समाज जसाच्या तसा आणि जिथल्या तिथे मख्ख उभा दिसेल! कादंबरीतून प्रकटणारा सामाजिक आशय कादंबरीच्या भारवत्तेला परिमाण प्राप्त करून देत असतो; हे गृहीतक प्रमाण मानून 'भावीण' कादंबरीचे वाचन केले तर पदरी निराशा येते.

☆☆☆



अनुक्रमणिका










# लेखकांचा परिचय

❋ **प्रा. डॉ. सदा कऱ्हाडे**

मराठीचे प्राध्यापक (निवृत्त), पार्ले महाविद्यालय, विले पार्ले मुंबई – ४०० ०५७.

❋ **प्रा. कृष्णा चौधरी**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. मर्ढेकरांची कविता, सौंदर्यशास्त्र आणि समीक्षापद्धती यांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** शिवाजीनगर, वरुड, जि. अमरावती. दूरध्वनी : ०७२२९ – २३४७३८.

❋ **प्रभा गणोरकर**

कवयित्री, काव्यसमीक्षक, साहित्याच्या गाढ अभ्यासक.

***पत्ता :*** कॅक्टस्, परिगणित कॉलनी, काँग्रेसनगर रस्ता, अमरावती ४४४ ६०६.

दूरध्वनी : ०७२१–२६६२७०३.

❋ **प्रा. रवीन्द्र घवी**

निवृत्त प्राध्यापक, धेंपे कॉलेज, पणजी, गोवा. 'गोमंतकीय मराठी वाङ्मयाचा इतिहास', 'स्वातंत्र्योत्तर गोमंतकीय मराठी कथा' इ. दहा ग्रंथांची संपादने, 'मागोवा' लेखसंग्रह.

***पत्ता :*** बी. ३, एस्. ४, पूर्वा, करंजाळे, गोवा – ४०३ ००२. दूरध्वनी : ९८२२६२७१७५.

❋ **प्रा. डॉ. रोहिणी तुकदेव**

'मराठी कादंबरी'च्या अभ्यासक. 'नवभारत'च्या लेखक.

***पत्ता :*** जी १०३, खरे हौसिंग ग्रुप प्रॉजेक्ट, मु. पो. धामणी, सांगली ४१६ ४१६.

दूरध्वनी : ०२३३–२३०२१११

❋ **सत्त्वशीला सामंत**

मराठीतील नामवंत कोशकार.

***पत्ता :*** १६, यशोदा कुंज सोसायटी, तेजस नगर, कोथरूड, पुणे – ४११ ०३८.

दूरध्वनी : ०२०–२५३८३७५५.

अनुक्रमणिका

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ■ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा) फोन(०२१६७)२२०००६.

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स अॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




